श्री

मराठी ग्रंथ-संग्रहालय, ठाणें.

महाराष्ट्र-काव्य-ग्रंथ

१९

कवीश्वर भास्कर कृत.

# शिशुपाल वध.

संपादक-कै. विनायक लक्ष्मण भावे,

बी. एस्‌सी.

---

प्रकाशक-सिताराम महादेव अभ्यंकर,

चिटणीस, मराठी ग्रंथ-संग्रहालय, ठाणें.

मुद्रकः—धोंडो काशिनाथ फडके.

अरुणोदय प्रेस, ठाणें.

विजयादशमी शके १८४८.

---

किंमत [illegible]

# महाराष्ट्र काव्य-ग्रंथ.



१ चांगदेव चरित्र
२ दासोपंत चरित्र
३ सीता स्वयंवर (नागेश)
४ रंगनाथ निगडीकरकृत कविता
५ अपरोक्षानुभव (जयराम)
६ रुक्मणी हरण (सामराज)
७ पंचरत्न
८ गीतार्णव अ. १
९ स्फूट कविता संग्रह
१० गीतार्णव अध्याय २
११ पंच-तंत्र
१२ रामायण (मुद्गल)
१३ शिवकथामृत
१४ स्फुट कविता संग्रह
१५ रामायण (माधव)
१६ बोधवैभव
१७ गीतार्णव अ. १२
१८ वस्त्रहरण
१९ शिशुपालवध

॥ श्री ॥

# चार शब्द.

ह्या उत्कृष्ट काव्य-ग्रंथाला 'प्रस्तावना' लिहून वाचकांच्या हातीं देण्याऐवजीं ह्या ग्रंथासंबंधीं 'चार शब्द' सांगून वाचकांना ते वाचण्याची विनंती करण्याची पाळी संस्थेवर आली आहे. 'महाराष्ट्रभाषा–सरस्वतीच्या महालांतील एक अज्ञात दालन' उघडण्याचा मान 'मराठी ग्रंथ–संग्रहालय, ठाणें' ह्या संस्थेच्या उत्पादकांपैकीं ज्या एकानें मिळविला, त्यांच्याच इच्छेनें आज 'मराठी ग्रंथ-संग्रहालय, ठाणें' ही संस्था त्या दालनांतील एक अपूर्व ठेवा मराठी वाचकांच्या हातीं देत आहे. श्री ज्ञानेश्वरांची ज्ञानदेवी पूर्ण झाली तत्पूर्वी सतरा वर्षें म्हणजे शके ११९५ मध्यें 'शिशुपालवध' हें काव्य निर्माण झालें. ज्या पोथीवरून हा ग्रंथ छापीत आहों ती १४ व्या शतकाच्या पूर्वार्धांत लिहिली असावीसें दिसतें. ह्या ग्रंथाचा कर्ता श्री भास्कर कवीश्वर ग्रंथ समाप्तीचा काळ ग्रंथाच्या शेवटीं देत आहे तो असा. 'हा शिशुपाल वधु : आईकितां तुटे भवबंधु ॥ जीवां होअे प्रबोधु : परमतत्वांचा ॥ शके शरांकरुद्रशत रोकडे : श्रीमुख माधवमासु चोखडे ॥ तै श्रीकृष्णाचे पवाडे : वाणिले मियां ॥ ऐसा नागार्जुनांचा दातारू : मिया वर्णिला श्रीचक्रधरू ॥ तो भक्तां मंगलकरू : भणे कवी भास्करू ॥' हा प्राचीन व रसाळ ग्रंथ मराठी वाङ्मय भक्तांच्या दृष्टीस पडतांच ह्या ग्रंथानें मराठी भाषेच्या इतिहासावर थोडा जास्त प्रकाश पाडला आहे हें त्यांच्या लक्षांत येईल. श्रीज्ञानदेवींत दृष्टीला दिपविणारें व बुद्धीला गुंग करणारें उज्वल तेज मराठी भाषेनें ज्या पायऱ्या चढून मिळविलें त्या पायऱ्यांकडे हा ग्रंथ वाङ्मय सेवकांची दृष्टी खास वळवील.

सुदैवानें एकदां त्या पायऱ्यांकडे नजर गेली कीं महानुभाव पंथांतील लेखकांचा मराठी भाषेसंबंधीं केवढा दांडगा व्यासंग होता हें कळून येईल. प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता भास्कर कवि हा महानुभाव पंथांतील सर्वांत श्रेष्ठ दर्जाचा ग्रंथकार होता त्याबद्दल दुमत होणार नाहीं असें वाटतें. महानुभाव पंथाचे आद्य प्रवर्तक श्रीचक्रधर त्यांचा हा शिष्य. भास्कर कवीची ग्रंथ-रचना विपुल आहे. ग्रंथांचा सर्व भर भक्तिमार्गाकडे झुकला असून श्रीकृष्णलीला वर्णन करण्याकडे कवीचा विशेष ओढा दिसतो. प्रस्तुत काव्यामध्येंही 'शिशुपालवध' हें कथानक निमित्तमात्र असून श्रीकृष्णलीला शृंगाररस प्रधान वर्णनानें ओथंबलेली दिसत आहे. भारत–भागवत ग्रथांत वर्णन केलेल्या शिशुपालवधाशीं ह्या कथानकाचें कांहींच सादृश्य दिसून येत नाहीं. काव्याचा प्रारंभ पाहून माघकवीच्या शिशुपालवधाचें अनुकरण करण्याचा कवीचा हेतु असावा असें वाटतें. पण पुढें पुढें तें अनुकरणहि टिकलें नसून कवीची रसाळ वाणी अगदीं

स्वतंत्रपणें श्रीकृष्णलीला वर्णन करण्यामध्यें दंग झालेली दृष्टीस पडते. काव्याचें परीक्षण करण्याचा अधिकार रसिकांचा आहे. त्यांच्याच पुढें हा ग्रंथ ठेवतों व त्या संबंधीं काय म्हणावयाचें तें त्यांनींच म्हणावें असें सांगून आम्ही आमचें हातीं घेतलेलें हें काम हातावेगळें करतों. हें काव्य मुंबई विश्वविद्यालयानें एम्. ए. च्या परीक्षेकरितां लाविलें आहे यावरून त्याचें महत्व लक्षांत येण्यासारखें आहे. हें काम रसिकांनां पसंत पडल्याचें कळल्यास महानुभाव पंथांतील ज्या महंतांच्या मदतीनें कै. विनायकराव भावे यांनां ह्या ग्रंथाची अस्सल प्रत मिळाली त्याच महंतांच्या सहाय्यानें ह्या पुढील ग्रंथ प्रसिद्ध करण्याची तयारी करूं. कै. भावे यांनां महंतांचा लोभ संपादून मराठी भाषेचा हा दुर्मिळ ठेवा पहाण्याकरितां किती प्रयास करावे लागले हें आतां जगाला सांगून काय उपयोग! कै. भावे यांनीं संपादन केलेलें महंतांचें प्रेम त्यांच्या ह्या आवडत्या संस्थेवर आहे ह्मणूनच रसिक वाचकांनां आम्ही वरील आश्वासन देत आहोंत. ही योजना पुढें कशी अमलांत आणण्याचें ठरलें होतें तें ह्या काव्याला पूर्व योजनेप्रमाणें खुद्द कै. विनायकरावजींच्या हातची प्रस्तावना लाभली असती तर त्या प्रस्तावनेंतच जाहीर झालें असतें. पण 'आलें देवाजीच्या मना तेथें कोणाचें चालेना.'

कै. विनायकराव भावे यांनीं कै. विष्णू भास्कर पटवर्धन वगैरे मित्रांच्या सहाय्यानें 'ठाणें मराठी ग्रंथ-संग्रहालय' ही संस्था ज्येष्ठ वद्य २ शके १८१५ (ता. १ जून १८९३) रोजीं सुरू केली, व त्यावेळीं "जे प्रसिद्ध झालेले नाहींत असे हस्तलिखित मराठी ग्रंथ मिळविणें व ते प्रसिद्ध करणें" असा ह्या संस्थेचा एक हेतु आहे, असें ठरवून या संस्थेचे पहिलें दशक संपण्यापूर्वीच अप्रसिद्ध महाराष्ट्र काव्यग्रंथ प्रसिद्धीस आणून आपल्या राष्ट्रीय वाङ्मयास अमूल्य जोड करून देण्याकरितां 'महाराष्ट्रकवि' हें मासिक पुस्तक शके १८२५ चे सरस्वती-पूजनाचे दिवशीं सुरू केलें आणि अविश्रांत श्रम करून येथील मित्रांच्या सहाय्यानें प्राचीन कवींचे हस्त लिखित ग्रंथ व पोथ्या मिळवून त्यांनीं संस्थेकडून सदरहू मासिक चार-साडेचार वर्षें उत्तम रितीनें चालविलें व महाराष्ट्राला प्राचीन कवींच्या काव्यांची ओळख करून दिली. संस्थेनें चालविलेल्या त्या कार्याचें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं अनुकरण झालेलें पाहून त्यांनां फार समाधान व अभिमान वाटे. आतां महानुभावी ग्रंथ महत्प्रयासानें मिळवून ते संस्थेकडून प्रसिद्ध करण्याचें त्यांनीं योजिलें होतें. विजयादशमी सारख्या शुभप्रसंगीं मुद्दाम संग्रहालयांत येऊन आपल्या उत्साही भाषणानें ते या संबंधीं वाटाघाट करीत. त्या वाटाघाटीचें फळ हें प्राचीन व दुर्मिळ **शिशुपाल-वध** काव्य संस्थेकडून महाराष्ट्राला दिलें जात आहे. या संग्रहालयावर इतकें निर्व्याज प्रेम ठेवणाऱ्या कै. विनायकराव भावे यांचें निधनानें या संस्थेची कधींहि भरून न येण्यासारखी किती हानी झाली आहे हें बोलून दाखविण्याला आमच्या जवळ पुरेसें शब्दसामर्थ्य नाहीं.

संस्था त्यांची सदोदित ऋणी राहील. 'मराठी ग्रंथ-संग्रहालय, ठाणें' हें कै. भावे यांचें प्रत्यक्ष स्मारक असून तें चिरस्थायी करून त्यांचें नांव अजरामर करण्याची जबाबदारी त्यांचे आप्त, इष्टमित्र, ग्रामस्थ व मराठी भाषा बोलणारी अखिलमहाराष्ट्रीय जनता या सर्वांवरच आहे. ती जबाबदारी आपापल्या शक्तिप्रमाणें पार पाडण्याची सर्वांना सद्बुद्धि होवो अशी शारदादेवीच्या चरणीं मनःपूर्वक प्रार्थना करतों व हें काव्यपुष्प महाराष्ट्र भाषा-प्रेमी रसिकांच्या हातीं देतों.

शेवटीं हा काव्यग्रंथ ज्यांच्या कृपेनें संस्थेस मिळाला त्या श्री दत्तराज कवीश्वर व श्री. हरिराजबुवा महंत यांची ही संस्था अत्यंत आभारी आहे. व त्यांनीं संस्थेवर असाच लोभ पुढें ठेवावा अशी त्यांस विनंति आहे. सदरहू काव्य प्रकाशनाचें व प्रुफें वगैरे तपासण्याचें कामीं आमचे मित्र रा. शंकर गोपाळ पैठास यांनीं जें सहाय्य केलें त्याबद्दल संस्था त्यांची फार आभारी आहे.

मराठी ग्रंथ संग्रहालय कचेरी, ठाणें.
विजया दशमी शके १८४८.

सिताराम महादेव अभ्यंकर,
चिटणीस.

# अथ शिशुपालवध कथा प्रारम्भः

श्रीजगद्गुरुवे नमः ॥ यं ब्रह्मबालं भुवनैकपालं संसारमायामतिमोहजालं ॥
यशोविशालं शिशु-पालकालं गोविन्दबालं मनसा स्मरामि ॥ १ ॥

मायासूत्रा ची करौनि दोरी : जो ब्रह्मादिकां खेळवीं अणेंगी परीं ॥
तो अलर्कु-ताप-हरी : नमीन श्रीदत्तात्रेयो ॥ १ ॥

दानवरुधिरा चिया ऊला : यादव-प्रताप-तरूं वाढीनला ॥
तो नमीन पर-ब्रह्म-पूतळा : श्रीकृष्णराऊ ॥ २ ॥

घेऊनि चैतन्या ची गवसणी : जेणें द्वारकामहातीर्थ केली चरणीं ॥
तेयां नमो श्रीचक्रपाणि : कैवल्यनाथां ॥ ३ ॥

रचौनि ब्रह्माण्डें सकळें : जो आत्मारामु होऊनि खेळें ॥
तेयां श्रीप्रभु ची चरण-कमळें : अभि-वन्दिली ॥ ४ ॥

दारूणसंसारुदु:काळीं : जेणें परमानंदा ची रांकुधनी केली ॥ पूर्णा
तेयां श्रीचक्रधरा चा चरण-कमळीं : लुंटतुसें ॥ ५ ॥

महामोहसांजवेळें चां वेळीं : प्रबोधा ची दिवेंलावनी केली ॥
तो ईश्वरादिचरण- कमळीं : नमितु नागार्ज्जुनु ॥ ६ ॥

नागार्ज्जुना चा दातारू : राणे-राऊ श्रीचक्रधरू ॥
ऊवीप्रबंधीं कवी भास्करू : वर्णितुसें ॥ ७ ॥ छ ॥ १ ॥

देखौनि महा-कवीं चा पंथू : मज होतुसें मनोरथू ॥
वाणावेयां यादव-नाथू : श्रीकृष्ण-राऊ ॥ ८ ॥

प्रमाण-दिवेयां चेनि बंबाळें : पांतां तरळैले वेदां चे डोळें ॥
तें श्रीकृष्णरूपु न निहाळें : ब्रह्मादिकां ॥ ९ ॥

आनंदा ची दिवाळी सनी : जेयां चेयां दर्शनां ची सिराणी ॥
तो कोणां श्रीचक्र-पाणि : गोचरू होये ॥ १० ॥
भक्तीज्ञाना चेनि बळें : महाकाळेंन सीं बांधलें दळें ॥
ते हीं वाणावें पर-ब्रह्म सांवळें : श्रीउद्धवार्जुनीं ॥ ११ ॥
नां ते जाणौनि सारासारु-वस्तु-विच्यारू घेऊनि वैराग्या चा कुठारू ॥
तोडिला संसार-तरू : जेणें नागार्ज्जुनें ॥ १२ ॥
मज नाहीं मतीचा प्रकाशु : कैंवी वर्णुं राणा परेशु ॥
परी जीवां होतुसें उल्हासु : स्तुती लागी ॥ १३ ॥
अठसटि तीर्थां चा तोडरू : चरणीं धावधवित मनोहरू ॥
तो तीर्थां राऊ श्रीचक्रधरू : वर्णितुसें ॥ १४ ॥
साहित्या चे नि परिमळें : शृंगारा चे नि मेळें ॥
प्रबंधें होती मातावळें : कवी-जनां चे ॥ १५ ॥
एथें नाहीं नवलु : वाणितां परब्रह्म केवलु ॥
कैसें दीसतीं बोलु रसालु : तें आइका वें श्रोता ॥ १६ ॥
मोतियां चें घोंषे : रांविले कुंकुम रसें ॥
तर्‍हीं न एति करौं सरिसें : प्रबंधें सीं ॥ १७ ॥
पांतां प्रमेयां ची गोडी : अ-मृता उपजे अ-नावडी ॥
साकरे ची कीजे कुरौंडी : कविता लते सीं ॥ १८ ॥
बोलु जेवि सुधारसें घोळिलें : कीं चांदिनां चुभळिलें ॥
नां ते परिमळें बोंबिले : चांपे या चे नि ॥ १९ ॥
पढतां श्रीकृष्ण पवाडें : ठिकसां बोलां घोंषु पडें ॥
रस रंगाचें पाहाळ उघडे : श्रोतें यां सीं ॥ २० ॥
वाणितां कान्हु चौ-हातु मल्लु : ऊडऊ होतुसे नवलु ॥
बोलु रसें दोंदिलु : नाचतु दिसें ॥ २१ ॥

कृष्ण कथें चें आलैं कीजे खोलु : बुडीं भाव-रसा ची जीती ओलु ॥
तऱ्हें प्रबंध लते ची वेलु : वाढती दिसें ॥ २२ ॥

वाणितां वन-माळी : शद्व सुखा ची होए नह्याळी ॥
कविता भली पाखाळीं : सुरंग दिसें ॥ २३ ॥

साहित्या चि अे सेजें : बोलां चा रंगू उपलविजे ॥
तेवींचि काव्य कीजे : भणे कवी भास्करू ॥ २४ ॥ ७ ॥ २ ॥

तार्किकां चि यां वज्र सांखळा : कीर्ती खांबीं नाळी ची अवलिळा ॥
माताइ तें वादी दिग्गजु सकळा : भू-मंडळी चें ॥ २५ ॥

साहित्या चि यां खेडकुळिया : सु-देशां बोलां चि यां चिपुळिया ॥
सिंपनें खेळतीं सांवळियां : रसवृत्तीं ॥ २६ ॥

फुन वाचां रसाळां : गर्वू सांडवीण कोंकिळां ॥
कल-हंसां अवकळां : करीन मी ॥ २७ ॥

नावाडी घेऊनी चंदनां रसीं : आंगां माखिजतु पाहे मासी ॥
तेवि गुण सांडौनि दोषु गिवसी : क्षूद्र-जनू हे ॥ २८ ॥

पाची चा गुण घे ढाळा चें मोतीं : ना तरी पह्वरेयां वाणवती: ॥
तेवी सु-जनु घेतीं : बोलु माझे ॥ २९ ॥

भणौनि शिशुपाळवधी कथा : जे भक्ती-रसां ची था ॥
कीं सोनवे कैवल्य-पथा : पाजळली तें ॥ ३० ॥

ना ते मुक्ती-वनिते ची दूतिका : कीं ज्ञानांजना ची शलाका ॥
कीं कैवल्यमंदिरी ची पताका : झळकतुसे ॥ ३१ ॥

ना तरी शांतरसें सींपतां : सासीनली ज्ञान-लता ॥
कीं विवेका ची सौभाग्यदेवता : मूर्ति जाली ॥ ३२ ॥

कीं प्रबंधवसंतीची कोकिळा : जीवु-चकोर-संजीवनी चंद्र-कळा ॥
कीं निम्ह्याळ संसार-वाटे ची विश्रामुशाळा : आर्त्तजनां लागी ॥ ३३ ॥

कीं अ-विद्यादुर्गी अवघंडी : अवचिती मोक्षा ची धाडी ॥
भणौनि विषया चिया नाइकु-वाडी : पळतां दीसती ॥ ३४ ॥

कीं धर्मकुढावेनि शार्ङ्गपाणी : महापातकां वरी सांघीतली सांघनी ॥
तेवी कथा अंतःकरणी : मजे पढियासली ॥ ३५ ॥

चैतन्या चेया चवरेयां वरी : जो निरंतरू राज्य करी ॥
तो उपनला वसुदेवा चां घरीं : श्रीकृष्णराउ ॥ ३६ ॥

मथुरे चां महाद्वारीं : खांडेनि पिटौनि जिंतिलें वैरी ॥
तो यादवां सी राज्य करी : द्वारके सी ॥ ३७ ॥

कह्वनी एकीं वेळीं : सु-धर्मु-सभे बैसीनिला वन-माळी ॥
तंवं देखीनिला अंतराळी : ब्रह्म-पुत्रु ॥ ३८ ॥

निम्हाळे महदाकाशा : विसांवां नाहीं कह्वनां दिसां ॥
तो शीनू सांगो एताअे हृषीकेशा : सूर्य्यो जेवीं ॥ ३९ ॥

कीं राहो-भेणें चंद्रू : टाकौनि एताअे यादव-नरेंद्रू ॥
तैसा वितर्किला मुनींद्रू : सकळां जनीं ॥ ४० ॥

तंवं अळमाळु रूपु झळकले : जैसे सत्व-गुणा चें वृक्षू सासीनलें ॥
कीं ब्रह्म-तेजु बांबळैले : नारदु-वेषें ॥ ४१ ॥

तैसा ची आकारू देखिला : जैसा चंद्र-रश्मि चा कोंभु फूटला ॥
कीं क्षीर-सागरू आंकुरैला : गगनभूमीं ॥ ४२ ॥

कैळवत्तरनिरी झळकैली : जाणिवेयां ची लुळी झळाळिली ॥
पिंगटा जटै ची कीळ फांकीनि-ली : दाहीं दींसी ॥ ४३ ॥

गात्री यंत्रा ची मिळनी : सप्तै स्वरां गुंफितु वेणी ॥
तेथ पातला भक्त-शिरोमणी : जंवळिके सी ॥ ४४ ॥

तंवं सभा-मण्डपू देखीला : जैसा नंव-रत्नां चा ठेवा आंतुडैला ॥
कीं मेरू चा गाभा कामाविला : विश्वकर्मेंनी ॥ ४५ ॥

कीं श्रृंगारा चा वसैठा : ना तो अनंगा चा कुरठा ॥
कीं उघडिला दारवठा : मुक्तीमंदिरींचा ॥ ४६ ॥
कीं संभोग-सुखा चिऐ हाटधारणे : विकते देखौनि सुखा चें केणें ॥
उभलें सुकीं ठाणें : मन्मथा चें ॥ ४७ ॥
तेथ श्रीचक्र-धरां जंवळीं : घणदाटस्थानी बैसली ॥
नारदें कैसी देखिली : तें सांघिजैलु ॥ ४८ ॥
इशानु अवसरीं : कुबीरू भांडारी ॥
इंद्रू हडप धरी : आंगा जवळीं ॥ ४९ ॥
धावना पवनु : कुऱ्हेरी वरुणु ॥
श्रृंगारु दे मदनु : कृष्णमेचु चा ॥ ५० ॥
फुल-बडवा ऋति-पति : बोलिका बृहस्पती ॥
आळती गानी सरस्वती : गंधर्व-राऊ ॥ ५१ ॥
सेनवै दिनकरू : वेचुकरी सुधाकरू ॥
एर परिवारू अपारू : तो कवनु जाणें ॥ ५२ ॥
ऐसी देखौनि स्थानी : विस्मीतु जाला मनीं ॥
मग साउमा आला मुनीं : श्रीकृष्णां दखावेया ॥ ५३ ॥
तंवं ठिकलगा सिंहासना वरी : बैसीणिलासें राऊ मुरारी ॥
वरी जाणविताए चवरी : चतुराननु ॥ ५४ ॥
तो श्रीकृष्णु नारदें कैसा देखिला : माया-मुसें ब्रह्म-रसु ऊतला ॥
कीं ठसा उमटैला : कैवल्या चा ॥ ५५ ॥
कीं भव-दग्धां जीवां वरी : वर्षावेया अमृतधारीं ॥
येदुवंश-महदंबरी : ऊळला कृष्ण-मेघू ॥ ५६ ॥
ना तरी येदु-वनविपुळीं : देवकी-देवी कल्पवल्ली ॥
कैवल्य-फळीं फळीनिलीं : जगां लागी ॥ ५७ ॥

कीं थोकले कैवल्य-निधानु : देखावेया दिव्यांजनु ॥
ना तें आनंदा चें रसायणु : भवरोगियां सी ॥ ५८ ॥

कीं चैतन्या चिअे मांदुसें : कैवल्या चें पाचिखंड जैसें ॥
देखौनि नीळें रूपु तैसें : विस्मितु जाला ॥ ५९ ॥

घेतां स्पर्शसुखा ची गोडी : तेणें श्रीकृष्ण आळंगिला भुजां दंडी ॥
तंवं आत्मा उभिताअे गुढी : रोमांच-मिषें ॥ ६० ॥

क्षीर-सागरा चा पाटु : जमुनें जळां होतां गोटु ॥
तरी उपमीजतां दानव-शिर-साटु : नारदें आळंगितां ॥ ६१ ॥

ना तरी कैलासा चीं अधोपरें : आळंगीतु इंद्रनीळां चीं शिखरें ॥
तरी उपमीजतें बाह्याकारें : श्रीकृष्ण नारदें सीं ॥ ६२ ॥

सोडितां क्षेमालिंगनू : नारदां होतुसें जगबोळा चें मानू ॥
कीं जगजुग पडिलें अ-समानू : एकें वेळें ॥ ६३ ॥

पद्म-रागा चेया रंगा वरी : घातेली क्षीरोदकु चाउरीं ॥
मग बैसवीला हरी : आदरें सीं ॥ ६४ ॥

मेळऊनि दधी दुर्वा गौरोचनु : कापूर कस्तुरी हरिचंदनु ॥
अर्चन करवी जगद्वंदनु : मुनी-रायां सी ॥ ६५ ॥

संसारुआगीं जग वनवळें देखौनु : वर्षावेयां गाजे आनंदा चा घनु ॥
तेसें बोलें दैत्य-सूदनु : नारदें सीं ॥ ६६ ॥

जो वसैठा वेदां चा : तेंया बोलतां मेघ-गंभीर-वाचां ॥
होतुसें वर्षाऊ अ-मृता चा : आईकतेंयां सीं ॥ ६७ ॥

पडिलेंया घरां ची बांदौडी : तुमचें दर्शनें होति पुण्या चियां कोडीं ॥
भणौनि दुर्लभू आजिची घडी : संसारियां सीं ॥ ६८ ॥

सुकृता चियां ऊला : जादवां चा दैव-द्रमू फळीनिला ॥
भणौनि प्रसंगु घडिला : जें आगमनु तुमचें ॥ ६९ ॥

एथौनी जादवां चे दी भलें : ऐसें आम्हां जाणवलें ॥
जें तुमचें दर्शनु जालें : भणौनिया ॥ ७० ॥

चंद्रू निववी जगा तें : मेघो वरुषें अमृता तें ॥
तेवीं साधु आपणेयां तें : दाखवीती स्वभावतूं ॥ ७१ ॥

महानुभावां चेनि मेळें : लाहीजेतीं आनंदा ची सोनेकेळें ॥
मग मनोरथुवेलीं ची फळें : हातें तोडिजेंती ॥ ७२ ॥

साधु-संगा चेनि भांडवलें : ज्ञान-मार्गों चा व्येवसाऊ फळें ॥
जो न जोडें पुण्यां चेनि बळें : ब्रह्मादिकां शी ॥ ७३ ॥

कांइ करौ अभ्यागतु : तुम्ही निजानंदें तृप्तु ॥
फुन जादवु करावेंया पुनैतु : स्वपंक्तिऐं ॥ ७४ ॥ ७ ॥ ३ ॥

ऐसें आइकौनी भणे मुनीश्वरू : जी ह्या ची तुमचा पाहुंनरू ॥
जें एकें वळें फेडावा भारू : उमपपणा चा ॥ ७५ ॥

कांइसें माना चें ऊझें : मी दासु किंकरू तुझें ॥
देविका-ताट-काढा हें ब्रीदु माझें : तिहीं लोकीं ॥ ७६ ॥

देविकीपाइकै चेनि बीकें : जगीं भणिजतु सुनीकें ॥
तें धाइ पांतां असती मिषे एकें : तरी हें तूं जाणसीं ॥ ७७ ॥

अगा जी हृषीकेशी : आझुइ कितीं चाळवीसी ॥
ऊळखी जालेंयां बुंधी कांइसीं : जाण राया ॥ ७८ ॥

तूं चैतन्य-गिरी-दुर्गींचा राऊ : दाटुदळेयां संसारां चा फेडावेया ठाऊ ॥
अवतरैलासी देवां चां देऊ : यादवा तूं ॥ ७९ ॥

जेयां-तें प्रमाणें नेणतीं : तेणें तुआं घेतली माणूषपणा ची बुंधी ॥
ऐसें सदैवुं बोलती : ब्रह्मविद ॥ ८० ॥

तुझेंयां रूपा ची दिशा : नेणती श्रुती डोळसा ॥
मग बोलतीं निपनवसां : आणआणूं ॥ ८१ ॥

नैपुण्य

अठरां पुराणां चें डोळें : तूं तें पांता जालें आंधळें ॥
पुन न दिससीं कव्हनें बोलें : चैतन्य-नाथा ॥ ८२ ॥

जेंयां वेदां ची आह्मां आशु : तेयां गिवसितां जालें सायासु ॥
भणौनि हो काज घेतलें मिषु : अनिर्वाच्यते चें ॥ ८३ ॥

आगमु निन्हां दांड-रूब : जाणपणें न पिएति आंब ॥
ते तुझेया मूर्ति-चंद्रा चे बिंब : न देखती चि ॥ ८४ ॥

रसाळीं बोली : काव्यें जालीं मातावळी ॥
तिएं ठाकों न लहाती जवळीं : सेया गाउवां ॥ ८५ ॥

स्तुतीं निन्हां धापसी : तूं ते बोलां पाहे हृषीकेशी ॥
सेवटीं नेति भणौनि आपैसी : गजबजीनिली ॥ ८६ ॥

ब्रह्म-गोळकां चिआं माळां : साजती जिए चां गळां ॥
असती तिए जंवळां : पुन लक्षे सी ना ॥ ८७ ॥

ते उ्ळगे श्रीचरण : तूं मिरविशी राणेंपण ॥
परी कहीं न करिशी संभाषण : विसरौनिया ॥ ८८ ॥

ऐसें उ्ळगतां कव्हणी एकीं वेळीं : तुज ची प्रवृत्ती उपनली ॥
मग गर्भ-सं-भूति जाली : महामाए सी ॥ ८९ ॥

मग जीवां चेनि मेळें : विकरलें पणा चें आठांगुळें केलें ॥
उपनलें एकें वेळें : अवघें ची ॥ ९० ॥

प्रकृती धाएं सूदली : तिआं वाढविलें बहुतीं वेह्याळीं ॥
लेंवविलीं पांच-पुडीं आंगली : इंद्रिआं चीं ॥ ९१ ॥

विषयां चें बाळ-लेणें : लेवविलेयां दीसतीं कोडिसवाणे ॥
मग कर्म-फळां चेनि आंगणें : रांगौं पांतीं ॥ ९२ ॥

तें व्हेळीं माया भूमिके चेनि पसारे : उभिली लिंग-देहां ची धवळारें ॥
तेथ इंद्रियां चीं परुशद्वारें : वावरा वेयां ॥ ९३ ॥

तिहीं गुणा चिए इटे चेनि पाडें : मेळऊनि पंच-भौतीकु दळवाडे ॥
उभीलीं तह्मरें निर्गुढें : स्थूल देहींचीं ॥ ९४ ॥

स्वर्गा चें मट एकवीस : वरी सुखाचे ठेवें अ-समसास ॥
अपार कां सदोष : दिव्यभोगां चें ॥ ९५ ॥

जेथ अर्ची-मार्गिचे खोल हाट : धर्ममार्गा ची राज-वाट ॥
चंद्रसूर्या चा चौ-बारां मांदी दाट : विसंवतेयां ची ॥ ९६ ॥

जेथ जैन-मार्गा चिआं आड-बिदीं : वेद-पंथा चिआं राजबिदी ॥
तेथ चालतुसें मांदी : धर्मादिकां चीं ॥ ९७ ॥

कुमरावळी तें दीह्मली ऐसी : परि सुख नाहीं कह्मनीं दीसीं ॥
तूं बाप्रे वीण हृषीकेषी : जीवजातां सीं ॥ ९८ ॥

उपनलें महा-मोहमूळां चां मुहूर्तीं : भणौनि वासु न पांसीं श्रीपती ॥
पोसनेआं दीह्मलें प्रकृती : यां ची कारणें ॥ ९९ ॥

न करिसीं चि पडिताळा : तरि कवणां चां असें जिवाळा ॥
आइकै गा गोपाळा : कृपा-निधी ॥ १०० ॥

तुआं स्नेहो सांडिलें : तरी जळों हें जिआलें ॥
आणीकें भणती आपुलें : तें कांई करावें ॥ १०१ ॥

तूं पिता जालासी : फुन लाळऊनि कहीं न बोलावीसी ॥
तें दुःख मनां वाचे सीं : अनुवादवे ना ॥ १०२ ॥

तुह्मा जालेआं अह्मरूं : जो अें दुःखा चा पूरूं ॥
तों सांगितां गंह्मरूं : सावरे ना ॥ १०३ ॥

डोळें कुह्मिजलें वाटु पांतां : फुण तुज साम्यु न दिसें अनन्ता ॥
ऐसेंनी काळ गेलें बहुतां : तुआं विणूं ॥ १०४ ॥

तात-पण नीकें केलें : जें रूपूं न दाखवीसी ची आपुलें ॥
कांई वीरू घेतलें : तें तूं जाणैसी ॥ १०५ ॥

तूं परात्परू : सचराचरां सीं गुरू ॥
तुझा करौ नेणतीं विस्तारू : ब्रह्मादिकें ॥ १०६ ॥

तूं स्वयं-प्रकाशु सदोदितु : परमानंद-दानी अनंतु ॥
सर्व-साक्षी सर्वगतु : परमात्मा ॥ १०७ ॥

तूं निर्गुण गुणसागरूं : साकार सांतां निराकारू ॥
तुझा करौ न अे निरधारू : कह्वनीं परीं ॥ १०८ ॥

योगियां रीगतां अडऊं : जेथे शक्तीतरूं चा आरुऊं ॥
तिअे परब्रह्मक्षेत्रिचा काळभैरऊं : तूं यादव-राया ॥ १०९ ॥

कीं कैवल्यवनींचा पंचाननु : कीं सुखसागरीचा जल-शयनु ॥
कीं आनंदमलय-गिरीचा चंदनु : तूं गोपि-नाथा ॥ ११० ॥

हातीं ब्रह्म-विद्ये चें सरळें : कंठीं शब्द-वेधा चें सांखळें ॥
ब्रह्म-तेजा चा कूंचा ढळें : मुगुटा वरी ॥ १११ ॥

तो तूं देवकीकूंसीचां सेजारीं : पहौंडलासी राया मुरारी ॥
भणौनि दिठीं पडिला संसारीं : एहीं डोळां ॥ ११२ ॥

वैराग्या चें नवसिअें प्राणिजे : महातपा चा पाउड वाइजे ॥
तऱ्हीं तूं तें पाहों न ल्हाइजे : कह्वणीं परीं ॥ ११३ ॥

तुझा उजू दिठिवा पडे : ते चि जीवा तूंसी भेटि घडे ॥
एऱ्हवी होतु कां पुण्यां चें गाडे : तेणें कांहीं नोहें॥ ११४ ॥ ७ ॥ ४ ॥

तंवं भणे उद्धवदेऊँ : तुमचा नीका भक्ति-भाऊँ ॥
गोसावीं एत-खेऊँ : जाणीतिला ॥ ११५ ॥

आतां ची भणतु होतें : सापें नारद न एती एउतें ॥
कांईं लावकैआं केउतें : आराती चि ना ॥ ११६ ॥

तंवं मेया भणातिलें : ना जी अधुनां तेहीं तें सांडिलें ॥
हळूं हळूं ची धरिलें : पदस्थ-पण ॥ ११७ ॥

तेंवी चि तुह्मीं केलें बीजें : तरी आलेंती कह्वणें कांजे ॥
। तें स-विशेषें विणाविजे : झडकरी ॥ ११८ ॥

देशकाळें निर्‍हां राडिकें : कांई कळीं चा कामठा न पिकें ॥
कीं बाधिलेंती आरोचकें : झोबिआं विणूं ॥ ११९ ॥

न होअें ची जुंझ भांडण : तर्‍हीं तुम्हां नाहीं खाजें जेवण ॥
कांईं पुसों रोडिकेंपण : जिआं हां चि लाभू ॥ १२० ॥

नाहीं केउतां झोंटधरणीं धडाडा : तरी कांइसा वेंळु फुडा ॥
काळु जातुसे खडाडा : कळीं वीणां ॥ १२१ ॥

जादवां चिअे राणिवें : कर्‍हणा हीं जुंझ नोवे ॥
श्रीकृष्णा चेंनि नावें : तंवं रागूं चि नाहीं ॥ १२२ ॥

भणौनि तुझां आयास : पडितांतीं उपवास :
आतां गमाल दीस : कर्‍हनीं परी ॥ १२३ ॥

देशी कांई वळें वर्तें : हें सांगा पां निरुतें ॥
लावाल कलहो नह्वतें : हें फुडें कीरूं ॥ १२४ ॥

तुमतें एतां देखिलें : तैं ची माझां जीवें धुस गेलें ॥
कांईं सांघांल उदैलें : तें जाणवें ना ॥ १२५ ॥

तंवं कें नारदु भणे : धुरां चा ठाईं एसनें बोलनें ॥
हें तुह्मां साजे मंत्रि-पणें : एरां बोलों न अे ॥ १२६ ॥

आमुतें भणतीं कळि-लावें : तरी आह्मी कांइसेंआ बोलावें ॥
कां निवांतू ची नसावें : आपुलां ठाईं ॥ १२७ ॥

फुन तुमचेनि रागें : जरीं असों ची उगें ॥
तरी आमुचें पोटु फुगें : न बोलतां ॥ १२८ ॥

आपुलेंनि रागिटपणें : जगीं होतीं भांडणें ॥
कीं मातें भणती नारदे एनें : लावकै केली ॥ १२९ ॥

एने चि कारणें : मिया सांडिलें कैलासां जाणें ॥
भणती शंभू सी विघडणें : एणें ची केलें ॥ १३० ॥

एकु वेळु मीं कैलासां गेलां : तंवं भणतीं हा कळि—लावा आला ॥
टाटाऊँनि बांधा वहिला : एऱ्हवीं जाइलु हा ॥ १३१ ॥

ते ह्रेळीं घेऊँनि विवसी : मीं जालां तापसीं ॥
जपतुसें वारानशी : तिऐ दी ऊँनी ॥ १३२ ॥

एऱ्हवीं चाहाडा चाहाडीं ची गोडी : ब्रह्म—विधें नाहीं फुडी ॥
स्वर्गू न लहाऐ एकु कवडी : तें पाऊँनीं ॥ १३३ ॥

आनंदु होऐ गोड्डू : फुन तो हीं नावेकु रांकड्डू ॥
भणौनी करौ न ऐ पाडूं : लावकें ऐसीं ॥ १३४ ॥

या ची गोडिया सांडौं न शकें : एऱ्हवीं हें कांईं नीकें ॥
जें लिपिजें पातकें : वायां वीण ॥ १३५ ॥

आतां सांडिलें उटें—रेटें : मज कोन्हां चें कांहीं न वटें ॥
पुण्य जोडावें गोंमटें : हा ची लाभु ॥ १३६ ॥

तनु जाली म्हातारी : जिआवें दीसु दोनि च्यारीं ॥
तंवं भणावें हरि हरि : मणिकर्णिकें सी ॥ १३७ ॥

एकु वेळु मणिकर्णिके सीं असें जपतु : तंवं मानुषें देखिलीं पळतु ॥
उदैलें आकांतु : एकें वेळें ॥ १३८ ॥

अक्षय—तृतीऐ चां दीसीं : विश्वेश्वरा पासीं ॥
बहुतें मारिलें तापसीं : एनें शिशुपाळें ॥ १३९ ॥

मैत्रा—वरुणा जवळां : भगवंतू एकूं मारीणिला ॥
ते वेळीं मीं पळालां : जीवु घेऊँनी ॥ १४० ॥

ओरेरे टाकौनि घोडा : भणती याचिआं जटै उपडा ॥
आतां कें जाइलु साबडा : आह्मां पासौनी ॥ १४१ ॥

ते ह्वेळीं हातीं काष्ट दंड घेतलें : कृष्णाजिना चें अव्गुण केलें ॥
मग मिआं हीं पाचारिलें : कां पितया ची आण ॥ १४२ ॥

पळतु–पळतु पाचारी : एकें हातें नीरी धरीं ॥
तवी चि भणें हरि हरि : जीवा भेणू ॥ १४३ ॥

भणतु नारायणु नारायणु : पळालां सार्ध योजनु ॥
मग केलें संध्यावदनु : सायंकाळीचें ॥ १४४ ॥

आपुलें ची आपणु : कांईं सांधौ धाकटपणु ॥
एऱ्हवीं तुझी आनु : भलां पळालों ॥ १४५ ॥

दैवें देह्य वांचलें : भणौनि तुझें चरणु देखिलें ॥
आतां माझें विणविलें : अवधारिजें ॥ १४६ ॥

दैत्यां दानवां चिआं लोथां : दाटला वसूं-धरे चा माथां ॥
तो भारु फेडावेआ जगन्नाथा : अवतरलासी तूं ॥ १४७ ॥

प्रतापानलें दैत्य-वन जाळिजे : पृथिवी चा भारु फेडिजें ॥
एसनें बळु न देखिजे : देवां माजी ॥ १४८ ॥

जे दैत्यां चां कुमरीं : मारिजेतीं थाप वेह्रीं ॥
तें पुरोडाशा चें वैरी : कांईं वाणूं ॥ १४९ ॥

लोकां चां सारविला ऊंबरा देखती : तरी एका शिता ची आश करीति ॥
तें केवीं दैन्यु फेडीति : मागतेयां चीं ॥ १५० ॥

तूं सकळ-देव-स्थापनाचार्यू : जेया चेनि प्रतापें तपे सुर्यू ॥
जेणें कंसु केला निर्वयू : बाळपणीं ॥ १५१ ॥

बरवेयां देवां दिक्षा गुरू : नागरां देवां खोंबकरू ॥
उदारां देवां सुधाकरू : तूं कृष्णराया ॥ १५२ ॥

उमेठेआं देवां निचनवा : आठाइतेआं देवां बंबाळु दीवा ॥
सिह्राणेआं देवां विगोवा : तूं सर्वज्ञ-राया ॥ १५३ ॥

देटिआं देवा चा बापु : सळवंगेआं देवां चां जगथापु ॥
उधटेआं देवां जगझंपू : तूं यादव-राया ॥ १५४ ॥

दाटदळेआं देवां चा आमाला : दापीतेआं देवां चा जगदळा ॥
झळाळिआं देवां चा पाळा : तूं गोपि-नाथा ॥ १५५ ॥

बोलिकेआं देवां चा विळासू : शृंघारिआं देवां चा रतिरसु ॥
साभिमानिआं देवां डोळेलासु : तूं देव-पती ॥ १५६ ॥

सुहावेआं देवां शिरोमणी : प्रतापेआं देवां तरणी ॥
तूं राया श्रीचक्र-पाणी : जगां माजी ॥ १५७ ॥

तुआं खांडेआं खरांटे नी : दानव-प्रतापु-केंरू फेडौनी ॥
वसुंधरे चां राऊळ-गणीं : साधूं स्थापिलें ॥ १५८ ॥

तरि तेआं चा करावा प्रति-पाळू : मारावा दैत्य शिशू-पाळू ॥
जो रावणरूपें होतां काळू : मागिला युगीं ॥ १५९ ॥

जेणें कैलास दुर्गा पाडिलें : सत्य लोकीं ठाणें घातलें ॥
सोनकानें उरगुढें घेतलें : वैकुंठीचें ॥ १६० ॥

वायो वरुणा चीं गह्वानें मोडिली : अमरावतिअें धाडी घातली ॥
येमपुरी नागवी केली : खांडां खापरां सकट ॥ १६१ ॥

खांडेधुआवन मागे अंतराळीं : कवडें उकळीं भू-तळीं ॥
रोटी मागे सातें पाताळीं : दादुलेपणें ॥ १६२ ॥

आराधितां अनेकी परी : जो तिहीं लोकां तें विचंबितु मारी ॥
तो आतां दमघोषा चां घरी : उपनलासें ॥ १६३ ॥

तो नावें तरि शिशु-पाळू : एऱ्हवी मूर्तिवंत काळू ॥
करीतुसें जग-बोळू : चराचरां सी ॥ १६४ ॥

तरि आतां दीस लागों नेदावे : तिहीं लोकां स्वस्थ करावें ॥
तेआं शिशुपाळा तें मारावें : तूं यादव-राया ॥ १६५ ॥

ऐसी आइकौनि विणवनी : सभें दीह्नली पाठवणी ॥
मग राउळां आलें श्रीचक्र-पाणी : सत्य-भामे चिआं ॥ १६६ ॥

पाहूनेरू सारौनि श्रीअनंतू : बैसीनिलें चित्र-शाळे आंतू ॥
तेथ गाववी सा वसंतू : नारदा करवी ॥ १६७ ॥

तो गांतां तरि एकटिका : परिं स्वरें पुरुतां नीका ॥
भणौनि चंद्रिचा हरिण मृत्युलोकां : एउँ पातुसें ॥ १६८ ॥

स्वरीचें पडिमठें गाइलें : तें नेणों कैसें राहावलें ॥
तंवं जेंगट्ट पीटीनिलें : मध्यरात्रीचें ॥ १६९ ॥

तैसें ची देउँ ऊठिलें : भीमकी चेआं राऊळगणां आलें ॥
तेथ कवतीकु वीतले : तें रसिकें आइकितूं ॥ १७० ॥

ते वैदर्भी ची बाळी : दीर्घू स्वासु घाली ॥
कैसी अवस्था भुतळी : वाटु पांतां ॥ १७१ ॥

होतिआं बहुती वासकसज्जिका : फुन तें अवस्था नवलु आइका ॥
जीवा मेह्लवनें निमिखा एका : देउँ पांतुसें ॥ १७२ ॥

चाहुली पडिलेआं अंत:करणीं : तंवं भणीतिलें रुकुमिनी ॥
हा वो कवणु असें आंगनीं : चाहाळु कांइसा ॥ १७३ ॥

तंवं सावासिनी भणितिलें : आवो आवो गोसावी आलें ॥
तंवं सखीजनु उठिलें : झडकरौनी ॥ १७४ ॥

वालिपे चिआं उल्ली : पाइंचीं नूपुरें पांगुराविलीं ॥
मग एरी कोनिआं परतली : वैदर्भी तें ॥ १७५ ॥

तंवं तो लक्ष्मी-कांतु : धाकुटियासी बोल करितु ॥
चांपेआं चेआं सेजारांतु : रीगता जाला ॥ १७६ ॥

चांदिनेआं पासौनि कोंवळा : मृणाळसुता चा पासवडा घातला ॥
तेथें एकी कडे बैसला : यादव-राउ ॥ १७७ ॥

पाअे धूअे लीळांवती : वारा घाली कमलावती ॥
तंवं ऊठवी प्रबोधावती : भीमकिअे तें ॥ १७८ ॥

ऐसें कांइसें वो निढाळपण : सर नव्हे तुझें कारण ॥
सामानु खेऊ राउळ आपण : बैसलें असती ॥ १७९ ॥

तंवं भीमकीआं भणितिलें : काह्यां हानतु करतळें ॥
कांइसे धाटे राऊळ काढिले : कांहीं जाणासि ना ॥ १८० ॥

तंवं भणे कमलावती : सांडौनि सत्यभामा पढयंती ॥
एथ आलेआं तुमचा मानु कितीं : वाढीन्निला ॥ १८१ ॥

एरीं भणे जरि तिअे चा अनुरागु : तंरी एथ आलेआ कवण उपेगु ॥
आवडी विणें सं-भोगु : विरसू होअे ॥ १८२ ॥

तें वसताअे मानसीं : ऐसेआं हीं यावें रात्रौनि सायासीं ॥
एह्वढी जोगवणूक कांइसीं : कांइ न सरे ॥ १८३ ॥

आतां कांइसीं वो बोलीं : पेठवीं पेठवी वहिली ॥
ना तरी मध्यमरात्री भरली : तरी राणे सुनावा पडती ॥१८४ ॥

तवं बोलिलें दैत्यविभांडें : आतां उसीरू होइल अपडें ॥
तरी यां हीं आपुलिअें चाडे : वावरों न अें ॥ १८५ ॥

एनें बोलें सनानिली : तंवकें बैठी ठेली ॥
जैसी श्रृंगारा ची दाटि उविली : मदनमंत्रें ॥ १८६ ॥

लावण्या चा सरोवरीं : मुखकमला चें पातें थरारीं ॥
तेवि अधरू कांपे भारी : प्राण कां पाचा ॥ १८७ ॥

अनंगा वागुरू चीरिली : ना तरी श्रृंगारा खिळनी बांधिली ॥
तैसी गांठी घातैली : भ्रूलतांसी ॥ १८८ ॥

आपुले नी शिह्यणे पणें : आंगीन्चे सात्वीकु लपऊ जाणे ॥
फुन चोळी तानताअे जेणें : तो भाऊ लपवे ना ॥ १८९ ॥

ते ह्वेळीं विस्मितमुखें हासीनीली : कामकळिके सीं टाळी घातली ॥
तंवं वैदर्भिआ भाइली : सावासिनी ते ॥ १९० ॥

ऐसें कांईसें वो हांस्यें : जे पुढिला चेआ जीवा रुसे ॥
जवळिलें घेती साचें : वायां विन ॥ १९१ ॥

सांडौनि गदारोळू : मज एनें घातला आळु ॥
तरि पुरवावा हा बोलु : भणे वो प्रोढे तूं ॥ १९२ ॥

आश नाहीं पुरपुटी : तरी कां न ठकांवे पाठीं ॥
मीं ॲंळवेनु दाटी : मळ यानिळा ची ॥ १९३ ॥

एतां आदित्यवासरी : कस्तुरिअे चें धाने पुन्ये करीं ॥
लागलिअें तरि शास्ति करीं : आपणेंआं आपण ॥ १९४ ॥

कापुरा चेआं तैला अंतु : घालीनु कांकणां चा हातु ॥
रवा काढीन निभ्रांतु : परिमळा चा ॥ १९५ ॥

विरहानलें तातली : चंद्रकळा होअे चुळचुळी ॥
ते ऐरणी करतळीं : घेईन मीं ॥ १९६ ॥

परागा ची पोटळी : घालावी मकरंदजळीं ॥
ते काढिता ती मळी आंगुळी : तरि लटीकि मीं ॥ १९७ ॥

जेआ नाहीं मंत्रगारुडी : जेआं चेनि लागलेआं न वांचिजे अर्धघडी ॥
तो मदना चां घटसर्पू काढी : तरि मीं सत्य होअें ॥ १९८ ॥

आपुलें मन चोखडें : हें दावावें जगा पुढें ॥
एऱ्हवी एवढी चाड न पडे : कह्वणां ची कीरू ॥ १९९ ॥

तंवं देॐ भणती साच ची : परि कड केलें आम्ही ची ॥
जें सळी लावीलि वायां ची : आपणेआं आपणु ॥ २०० ॥

आह्मां विषयां चा विटाळु सदा : भणौनि न विसंबों ब्रह्मपदां ॥
परि पडिलों फांदां : बहुतां दिसां ॥ २०१ ॥

स्वयंवरा आली उर्वशी : ते मागौती पाठवीलि साधुसीं ॥
परि बुद्धि ठेली कैसी : जें हें चि प्रणावी ॥ २०२ ॥
सु-देवें ब्राह्मणें : पुठ चढविलें वायानें ॥
सेवटीं एकें हीं गुणें : भुंजों न अे ॥ २०३ ॥
तें ब्राह्मण एकसर साबडें : माणुस नेणें फुडें ॥
एऱ्हवीं ऐसीं माकडें : आह्मां कां लागतीं ॥ २०४ ॥
तंवं भीमकी भणे : पहा वो तंवं या चें बोलणें ॥
मातें माकड केलें एणें : आपुली से नाहीं ॥ २०५ ॥
वाढीनिला गोकुंळी : भणौनि कह्वणी लेंकीं नेदी आपुली ॥
तेयां उर्वशी स्वयंवरां आली : वदतां लाज नाहीं ॥ २०६ ॥
ताक-वीकीतियां गौळणी : देजासि वैकुंठ मनी ॥
ऐसेंआं हीं यां ची नेसवणी : कह्वणी ने घे ॥ २०७ ॥
नुजवे ची कह्वणें बोलें : आंगां आठुवर-पण आलें ॥
तेह वेळीं नंदें लग्न लाविलें : तुलसी सीं ॥ २०८ ॥
सेवटीं तेणें झाडें कांइ होअे : आपुलिअे इच्छा भुंजों न अे ॥
तेह वेळीं रानीं हिंडितां पाहे : गौळनी तें ॥ २०९ ॥
यआं सी कुळ ना ज्ञाती : रूपु ना संपत्ती ॥
गाइराखैया चिआं परौती : वृत्ती नाहीं ॥ २१० ॥
ऐसेंयां अवघेआं जाणतां : गोतां कुटुंबां वारितां ॥
कैसी कासोटेकारा भगवंता : वरिपडी जालिअे ॥ २११ ॥
विचारौनि पांता : शिहाना नाहीं दादा परौता ॥
कितीं मोडा केला येयां देतां : माझेनि लोभें ॥ २१२ ॥
तंवं भणे हृषीकेशी : हा ठाउ वेऱ्हीं तूं तेयां पढिअेसीं ॥
तारि थोरूं चुकलीसी : जें तो चा वरावा होतां ॥ २१३ ॥

आह्मीं कासोटेकार भिकारी : तो राजकुमरू तूं सुन्दरी ॥
दोघें नांदतां सेजारीं : भलीं दीसतीतिं ॥ २१४ ॥

तंवं भीमकिया भणितिलें : हें ययां कांइ वो जालें ॥
कैसीं घालिताअे गरळें : काळकुटा चीं ॥ २१५ ॥

कैसी वो मानुसें : सपाइनि परंवसें ॥ सर्वस्वी - परमार्थ
तोंडे पाप घेती कांइसें : वायां वीण ॥ २१६ ॥

तंवं देऊ तवुंकले : मांचेआं वरौनि ऊंठिलें ॥
कंठा पाशि कांधरिले : नीगतनीगतां ॥ २१७ ॥

तंवं रतिरासिका भणितिलें : आंवो आंवो मान-बरळें ॥
गोसांवी निगाले : बुझावी वाहिली ॥ २१८ ॥

तंवं बोलिलें वैदर्भिया : जा तुह्मी एकी धापासियां ॥
तुह्मां लागीनिलिआं गौ-मासिया : तरि वारां जा कां ॥ २१९ ॥

तंवं भणे रतिसांदेशी : वो तुटी न करी एणें सीं ॥
हा पांढरां संन्यासी : तूं कांहीं जाणैसी ना ॥ २२० ॥

तंवं भीमकी वदे आवेशीं : सर तूं हीं एकी धापसी ॥
नेणों तुज जोडला सायासीं : तरि खडा अेत्राअे ॥ २२१ ॥

तंवं बोले अरुणावती : रात्री जाहली वो पाहाती ॥
आह्मूंई उजगरा कितीं : कराल तुह्मीं ॥ २२२ ॥

उंठा वो उठीं वहिली : लागी देवां चां चरणकमलीं ॥
एकीं एकीं घडी तुटैली : तें कह्मणा मागाल ॥ २२३ ॥

तेंह्र वेळीं ते नायका : भणे येयां चिआं कवतिकां ॥
मीं पायां लागें कां : कांइसेयां लागीं ॥ २२४ ॥

तंवं भणे कुमुदहंसिनी : नाह्रीं तुझेनि पाडें शिहानी ॥
हे चोळी गेली उतटौनि : तैं ची जाणिलें मियां ॥ २२५ ॥

कंपु लपवीसी आंगिचा : स्वेदू पूसीसी कपोळीचा ॥
ऐसनां भाऊ उचंबळला मनींचा : तेआं तूं कांईं करींसि ॥ २२६ ॥
सखिअे चिआं बोला वर्मैली : तै वैदर्भा ची बाळी ॥
मग पायां लागैली : प्राणेश्वरा चां ॥ २२७ ॥
पढियंतें पायां पडे : तेथ रसिकु श्रृंगारीं बुडे ॥
परि तो आत्मारामू भणौनि न पडे : तेआं वळसां ॥ २२८ ॥
असो हें बुझावनी जाली : सखिया पाठवणी दीह्मली ॥
मग संभोगसुखें प्रकाळैली : रात्रीं तेयां ॥ २२९ ॥
उदेयांचा विधी सारौनी : उद्धवदेवां हातु धरौनी ॥
भद्रा सि दैत्यसुदनी : एतां जाला ॥ २३० ॥
मग नारदां पाठवणी दीह्मली : तो लागे देवां चा चरण-कमलीं ॥
श्रीकृष्णां सांडितां प्राणापदी जाली : ते सांधों नेणिजे ॥ २३१ ॥
नागार्जुना चेनि दातारें : मानऊंनि श्रीचक्रधरें ॥
आंगसीकें दीह्मली उदारें : भणे कवी भास्करू ॥ २३२ ॥
ऐसिआं आवसरीं : राजसूय यागा यावेआं मुरारी ॥
धर्में पाठविला मुह्मारी : वीरचूड तो ॥ २३३ ॥
सवें साति लक्षां दांडिया : बारालक्षु तेजियां
हस्ती मर्दीं लागलीयां : पांच लक्षें ॥ २३४ ॥
जेयां महाकाळु आंकना : तो दरवावेयां प्रतापियां राणा ॥
वीरचूडु पेणो वेणा : एतां जाहला ॥ २३५ ॥
पांचाळ देशूं लंघौनीं : पातलांसे झड करौनी ॥
तंवं देखीन्निली राजधानी : यादवां ची ॥ २३६ ॥
तें जेवी विश्वकर्मेयां आराधितां : शिल्पविद्यें ची अधिष्टात्री देवता
प्रत्यक्षु जाली वेळु न लगतां : भूमण्डळीं ॥ २३७ ॥

ना तरि दिव्यतेजा ची मांदूस उघडली : कीं विश्वप्रकाशां ची पेटी–फुटली ॥
कीं नव–रत्नां ची खाणी लागलीं : समुद्रा माजीं ॥ २३८ ॥

कीं रावणा चेनि भुजां–बळें : कैलासतेजू आंदोळ्ळें ॥
तें बिहालेपणें महेशें लपविलें : समुद्रा माजीं ॥ २३९ ॥

कीं पर्वतां जाली इंद्रवाहार : तै समुद्रा चे करौनी राजधर ॥
आपुलें लपविलें अंतौर : मेरूपर्वतीं ॥ २४० ॥

कीं लाटा चेनि पैले : वडवानळा चे तेजु हेलावले ॥
कीं वैकुंठ प्रतिबिंबलें : समुद्रा माजी ॥ २४१ ॥

कीं त्रिगुणां चिअें पैली अवघडूं : निर्मिला शांभव सुखां चा मढूं ॥
तेथ ठेवा असें उघडूं : परब्रह्मां चा ॥ २४२ ॥

कीं जगां तें भूलवीति : ते श्रीकृष्णाची वेधवती ॥
तैसी देखीनिली द्वारावती : दुरौनियां ॥ २४३ ॥

सांउमा आलां कवतिकें : तंव जेया चें रूपु मेरू तें जिंके ॥
तें क्रीडापर्वतु देखिलें नीकें : चहूंकडे ॥ २४४ ॥

तेयां भीतरीं दाहां गाउंआं माणें : साकरे ची भूमी गुणें ॥
तेंथ वनें उपवनें गोपींनाथा चीं ॥ २४५ ॥

पूर्वदिशें तारावन : दक्षिणें विलासवन ॥
जेवी कां राऊळगण : वसंता चें ॥ २४६ ॥

पश्चिमदिशें कमला-वन : उत्तरदिशें जैत-वन ॥
जेथ उभिलें असें पाळेंगण : कोंकिळां चें ॥ २४७ ॥

जेथ सतरां शतें उद्यानु : तीनि सहस्रें उपवनु ॥
एरां वनां ची गणनु : कवण जाणे ॥ २४८ ॥

जिअें आपुलियां बरवां : नंदनवना तें मागती वरिवां ॥
जेथिचें हांसती आरव : उमावना तें ॥ २४९ ॥

इंद्रनीळां ची खोली : गगणा सी घातिली सगळी ॥
तैसीं श्यामिका अंतराळीं : देखिली तेणें ॥ २५० ॥

कीं मदविअें चा सेला : वनश्रियां वेढिला ॥
ना तो वसंतें वर्त्तु वाविला : नीलोत्पलां चा ॥ २५१ ॥

गाभेवनां चें करौनि माप : मविजे परिमळा चें मोप ॥
तेयां सोनेंकेतकी चें कूंप : चहूं कडें ॥ २५२ ॥

पवळेयां चेंआं मणि खांबिया : वरि डोलती रत्नां चिआं बगडपाछिया ॥
कल्पतरू चिआं मानाठिया : हेलावतीं चहूं कडें ॥ २५३ ॥

जेथ पाणि ढाळी वसंतू : दारें धरी मळअेमारुतू ॥
अुम्टे लावी रति-कांतू : पार्यातकां चे ॥ २५४ ॥

बनकरां चिआं आंडौरीं : रत्नां चे हात-गुंडे वेऱ्हीं ॥
सोंकारितांति तुरंबिआं वरी : पूंसेयां तें ॥ २५५ ॥

हातीं घेउअ्नि आधाटी : एकीं गाती स्वरीची पडिमठीं ॥
तेनें रंगे पहुडला उठी : अनंगरा चा ॥ २५६ ॥

चंदनतरूं चिआं साउलिया : परागा चिआं सुपैतिया ॥
तेथ डोळां लागें रती शीतलियां : राजकुमरीं ॥ २५७ ॥

कामकटकां चा गजबजाटूं : तैसा कोंकिलां चा कलकलाटूं ॥
जो आइकिलेआं होय हृदयस्फोटु : विरहियां सी ॥ २५८ ॥

तो प्रदेशू कैसा वाणावा : जेथ सदां साहीं ऋतु चां मेळावा ॥
फुन वसंता चा उठावा : तो आनू चि दिसें ॥ २५९ ॥

कैसा ऋतु मातावळा : जडां उपजवीं काम-कळा ॥
विषयसुखा चा सोहळा : झाडां दावितुसे ॥ २६० ॥

तो चंद्रा चा वेळाइतू : कीं सुखा चा ठेवनाइतू ॥
नोतो आंगवणे चा राउतू : मदनसंग्रामीचा ॥ २६१ ॥

तो लावण्यदुर्गींचा अंतरराॐ : कीं तारुण्यवनीचा वन-देॐ ॥
ना तो संभोगसुखा चा वाॐ : मन्मथा चा ॥ २६२ ॥

कीं काम-तत्त्वां ची भार-दोरी : बांधिता पांचाखरी ॥
ना तो उघडा खाणौरी : अनंगा चा ॥ २६३ ॥

ना तो शृंगारा चा कड-वळिया : कीं मदना चा जावळिया ॥
कीं प्र-मदा चा बाळिया : अडलाऊं तो ॥ २६४ ॥

अनंगा केउता हाथिअेरू : फुन सदा विसुरा करी थोरू ॥
घरी वसंता ऐसा जुंझारू : भणौनिया ॥ २६५ ॥

जगा चें बळ जेया चां हातीं : भणौनि कामें केला सारथी ॥
एऱ्हंवी मधुकरां चां सातीं : केवि जीणवे ॥ २६६ ॥

फलां चां सराटी : केउती जुंझा ची गोष्टी ॥
फुन वसंता ऐसी धूर लाठी : भणौॐनि जीणे ॥ २६७ ॥

कामिनियां चें वर्म कर्मु चांग जाणनें : भणॐनि तेयां मदना चें आवगुणें ॥
पुढा पाचारौनि जीणे : त्रिअंबका तें ॥ २६८ ॥

कोकिळां चें बोलनें : अवचितें घालि घालनें ॥
आधीं ची वंसता चे उपलाने : खोचौनि गेलें ॥ २६९ ॥

काकुलतौलिया राज-कुमरीः लपालियां फुलां चं सेजारी ॥
तेआं मदना चां शरीं : विभांडीनिलियां ॥ २७० ॥

जडें चे ॐडन : करीत पळती तपोधन ॥
परि भीतरील संधान : लाटे चि ना ॥ २७१ ॥

विश्वासिलेनि मळया-निळें : परिमळा चें भुरें घातलें ॥
जाहरीं जगसापु डविलें : वसंता चां ॥ २७२ ॥

असो हें चौगुणा चढली परिमळा : नवल रंगछाया कोकिळां ॥
मकरंदु दुनावला भला : कमलवनींचा ॥ २७३ ॥

अम्रफळां महूर दाटले : श्रृंघारें मधुकर डोहळेलें ॥
कामिअें रातलें : विलसिनिआं ॥ २७४ ॥

परागें धुळवाडी खेळिजे : जाउडेया चेनि पाणिअें सिंपिजे ॥
हळुवारु लेणें लेइजे : कुसूम-कलिकां चें ॥ २७५ ॥

आंगिचेनि गौरपणें रंगली : वालीप जाली पींवळी ॥
ते चि स्वयेंभु सियांळी : वेढीजताती ॥ २७६ ॥

माधवी मंडपा चां सेजारी : योगियां तें झळंबी कामुल्हरी ॥
ते विषयां ची भूलि संसारी : कवणां न ठके ॥ २७७॥

बापु रे चोज : कैसें माजिरे पुष्परज ॥
कोन्हीं कोन्हा ची न धरी लाज : जग पिंशें जालें ॥ २७८ ॥

ऐसी कवणी ते मानिनी : जे न मनी बुझावनी ॥
आपैसेआं लागे ना चरणीं: प्राणेश्वरां चां ॥ २७९ ॥

देइजे कस्तुरिअे चा सींवकारू : घालिजे मकरंदा चा तुषारु ॥
तऱ्हीं विरहोज्वरा उपचारू : होववे ना ॥ २८० ॥

कापुरा चेनि पराग उटीजती : मोतियां चेनि रसें न्हाणीजेती ॥
चंदना चिया चोळिआं लेवविजेती : तऱ्हीं धडाडी अधिकुं दिसें ॥ २८१ ॥

विरहानल न मनी धावनी : तरि केवि वाचलिया विरहिणी ॥
परि होइल प्रिअें सीं मिलनी : या चि आशा ॥ २८२ ॥

विरहानला चा भरी : आंबे पालवे यां ची करौनि आधातुरी ॥
कोकिळां बोलावितु मधुरा स्वरी : वल्लभा तें ॥ २८३ ॥

कमलदला चेया रंगा वरी : मातावळेआं अनंगलहरी ॥
धुमाळी खेळती मधुकरी : प्राणनाथें सीं ॥ २८४ ॥

पालविआं चिआं चाउरिया : बैसनें घालीति साळेंयां ॥
गोठी सांघेति श्रीकृष्णा चियां : विरहिणी सी ॥ २८५ ॥

मदनमोगरेया चां साबरां : पडिऊनि मकरंदा ची मदिरा ॥
धुमाडि करितांति मधुकरा : रूंझी घालितांति ॥ २८६ ॥
परिमळें दोंदिलु : हालौ न शके मळेयानिळु ॥
तर्‍हीं विरहिणी सीं आदळु : घेऊं न संडी ॥ २८७ ॥
कल्पवेली चिआं मांडवा ताळियां : यक्षकर्दमा चिआं खेडकुळिया ॥
तेथ सिंचणें खेळती सांवाळियां : सोमयक्षणी ॥ १८८ ॥
असो हे वर्णनु : सांघेनु रुखां चे जातिजीवनु ॥
एर्‍हवीं श्रोतें ठेवीति दूषणु : प्र-बंधकरणीं ॥ २८९ ॥
जफ़लीं ॠतुवरू : आंबेयां चें रूख-राअे थोरू ॥
जैसें होति गुढरूं : अनंगा चे ॥ १९० ॥
सोनेआं चां फुली : मदन-लिंगें पूजिली ॥
तैसिआं दिसतीं ॠळीं : चांपेयां चिआं ॥ २९१ ॥
डोलनेयां चेनि मिषें : कुर्बकु एरू वातियां झोंबतुसें ॥
बापु कामा चें पिशें : झाडां लागलें ॥ २९२ ॥
कैसें लटिकें हे मधु-केसरू : डोलनेआं चें करौनि मिषांतरू ॥
प्रमादां ची उसिटी मदिरू : पीऊं पांतांती ॥ २९३ ॥
अशोकां चीं झाडें : कामिनीचरणां लागी सचाडें ॥
तै आबुलिआं चिआं पायां न पडें : ऐसा कवनु असें ॥ २९४ ॥
मोतियां चे आकारू : तैसे फुललें सिंदुवारू ॥
पुनाग नागचांपे गंभिरु : सिरों वेर्‍हीं ॥ २९५ ॥
परागें घोळिलें प्रियाबळ : पालवीं फुलिलें अशोख बकुळ ॥
नर्‍हाळीं दावितांति पाडळ : परिमळा ची ॥ २९६ ॥
वसंता चिआं अंतौरिआं : स्थनु-भारें खालाविलियां ॥
तेविं फलीं लविनिलिआं : मातुलंगी ॥ २९७ ॥

मदन मंडपाचिआं डिळी : तैसिआं सराळिआं नारिअेंळी ॥
फल-भारें पोफळीं : अंदोळताती ॥ २९८ ॥
नारंगी जांबु बुडीं : पसरौनि बरौतिं च्यंचुवाडी ॥
गळत रसु झेलितीं होडीं : चक्रवाकें ॥ २९९ ॥
मदना चे चांदोवे जैसें : लोंबतु नक्षत्रां चें घोषें ॥
भणों ते द्राक्षां चे घड तैसें : फुन तें मधुर न होति ॥ ३०० ॥
जेहीं परिमळा चेनि धीरें : प्र-बोधा वरी घेतिलें मारें ॥
ते नवे वाटोगरें : उमलतांती ॥ ३०१ ॥
जेयां चेंनि बळें : मदनु विवेके सीं घे संवफळें ॥
तेयां राअे-चांपेआं चीं फुलें : फांकतु दीसतीं ॥ ३०२ ॥
कस्तुरिअे चे करौनि वाफे : लाविजेंति पांची चीं रोपें ॥
जिअें वेलाउळें द्वीपें : मन्मथा चीं ॥ ३०३ ॥
मारौनि विवेका चा तराळु : घे वैराग्या चा कोळु ॥
तो वाळाकरू बाळु : लाल्हातु दिसें ॥ ३०४ ॥
असो हें देशवळु : एथें श्रोतेयां नाहीं नवळु ॥
पुढां सुर-तरू देखिनिलें विशाळु : ते सांघें कैसें ॥ ३०५ ॥
जेयां मालखंडा चीं आळीं : सांधीजेती चंद्रा चां खांदवखालीं ॥
तेयां कल्पतरू चीं फळें तळीं : पडैलीं दीसतीं ॥ ३०६ ॥
इंद्रादिकां देवां : परिमळा चें करितु आवारिंवां ॥
तेयां पार्जातकां चें लाखरवां : असमसास. ॥ ३०७ ॥
जेयां कस्तुरिअें ची बुडवती : कापुराची उम्ळी भवंती ॥
तेयां मांदारा चीं फुलें वेंचिती : बटुकिया देवां चियां ॥ ३०८ ॥
आतां भणे कवी भास्करू : एथ कांइसा भरू ॥
साउमा करावासे विंस्तारू : पुरि वनां चा ॥ ३०९ ॥

ऐसीं वनें पांतु उभा ठेला : कवतिकें माथां तुकिला ॥
मग साउमा निगाला : वीरुचुड तो ॥ ३१० ॥

तंवं बनां निंडी : देखीनिली पानां चीं तांडी ॥
तेथ टांपुआं चिआं कोडी : उघडितांतीं ॥ ३११ ॥

मांदारां चां फाकीं थाटीजेती : चांपाठिआं चे कोड्व कीजेती ॥
कनकां चां लोटीं सिंपीजेती : वेलीं सातुसेआं चियां ॥ ३१२ ॥

तैसा ची साउमेयां निघाला : तंवं जो जगीं खोलिया वाखाणला ॥
तो जीतां अगड्ड देखीनिला : समुद्रा चा ॥ ३१३ ॥

जेथ सावजां चां धुधुवाटीं : झुंगियां चां रुणझनाटीं ॥
लाटां चां घडघडाटी : आकाश गाजे ॥ ३१४ ॥

मनें चिंतितां अवघड्ड तो उतरौनि समुद्रा चा अगड्ड ॥
साउमा आला वीरचुड्ड : दळभारें सीं ॥ ३१५ ॥

तंवं द्वारका देखीनिली : जिआं रूपें अमरावती जिंतिली ॥
चिंतामणी चा राज-भरू घेतली : अमरावती ॥ ३१६ ॥

जिआं सत्य-लोकु दुहूऊं केला : कैलासां पाणी वाहाविला ॥
वैकुंठां गरऊ सांडविला : बरवेंपणां चा ॥ ३१७ ॥

कमलविकाशा पुरतां : जेथ सदां उदैजे सविता ॥
न तपें परौता : बारां हीं मासां ॥ ३१८ ॥

अमृता चेनि वडपें : श्रृंगारा चें दपनें सिंपे ॥
तो चंद्र संपूर्णरूपें : सदा उदै जे ३१९ ॥

जेथ अनंदरसें ढुलती : अठरां हीं वंशजा जाती
दुमदुमा दाबुक वाती : संसारा वरी ॥ ३२० ॥

जेथ पांतां चहूं कडी : आठरां गाउआं बाहीरि वाडी ॥
मुदमदित भीतरीनिली वाडी: बारां गांउवें ॥ ३२१ ॥

तेथ सप्त पौळीं : रत्नतेजा ची बाह्याळी ॥
उच्चपणें देतीं कवळी : धूमंडळां सीं ॥ ३२२ ॥
रत्नगिरी चीं विचित्रें शिखिरें : तैसीं आणआणी परि चीं गोपुरें ॥
तेयां भीतरीं रीगे घसरें : वीरुचूड तो ॥ ३२३ ॥
पुढां कनका चें कळसु देखिलें : जैसें तेजा चें पाहाल उघाडेलें ॥
कीं आधारी ठाणें घातीनिलें : सूर्य्य बिंबा चें ॥ ३२४ ॥
सी नि सहस्रां हटवटियां : तेयां माजी तेरां शतें ती खणियां ॥
कणैरियां पांच खणियां : सतरां शतें ॥ ३२५ ॥
एसनीं सांधितां रचना : कवतीकु होइलु मनां ॥
परि करावीसे वर्णना : भीतरीलु वाडिअें ची ॥ ३२६ ॥
जेथ पांच लक्ष केसरादि : च्यार लक्षें कुंजरादि ॥
ऐसियां सोनेआं चां प्रसादीं : गगणु झांकोळलें ॥ ३२७ ॥
मांडौनि नवरत्नां चें चीरें : उभिलीं नंदजायांदिकें मंदिरें ॥
जिअें घडितां साधुनूक सरें : विश्वकर्मेयां ची ॥ ३२८ ॥
कापूरवाणियां चां हाटीं : घेइजे पोतासा ची पेटी ॥
एकीं तारे साटीं : तुकें विण ॥ ३२९ ॥
कैलासवैकुंठीं जेयां ची सिरियाणी : तिअें रत्नें विकिती कवडेनी ॥
आळोंआळीआं चिंतामणी : बोडिअें बचकूं ॥ ३३० ॥
मेणिका तारा उर्वशी : वोळी धर न लहाती कव्हणीं दीसीं ॥
ते हाटवटी वाणौ कैसी : सामाण्यु वनितां ची ॥ ३३१ ॥
चालावेआं वैराग्यमंडळां : श्रृंगारें आपुला दाखाळा पाहिला ॥
कवतिकें दाखविला : मन्मथा सीं ॥ ३३२ ॥
कीं मदना चां मेळीं : पूर्णचंद्रा ची नाइकवडी आली ॥
कीं आकाशां इडु बांधिली : कापूरकेळी ची ॥ ३३३ ॥

कीं श्रृंगारा चीं बाणलिंगें : माडा वरी थापिलीं अनंगें ॥
तैसीं स्त्रीरत्नें दोहीं आंगें : देखता जाला ॥ ३३४ ॥

नवरत्नां चां चौबरां : पद्मरागा चा लंबोदरा ॥
वाटारंभी साउंबरा : नाचतु दिसें ॥ ३३५ ॥

ऐसें हाट चौहटें पांतु : दळा चेनि धसरें असें जातु ॥
दरवावेआं अनंतु : मंगलमूर्त्ती ॥ ३३६ ॥

तव देखिलें महाद्वार : जेथ एकवीस खनां चें दामोदर ॥
उभिलें निगुतीं अरुवार : विश्वकर्मेनि ॥ ३३७ ॥

दळ बाहिरी पारुखविलें : रिगाला सारितु मांदियाळें ॥
तंवं देखीनिली राउळें : गोपीनाथा चीं ॥ ३३८ ॥

तेथ क्षीरपुरां भ्रांती : राजहंस स्फटिकांगणें चाटिती ॥
पाइचेआं पूसेआं झेंपावती : मांजरू जवादिऐ ॥ ३३९ ॥

चंद्रकांता चेयां बाळानेयां वरी : घोंसाळेयां कांकणां चां करीं ॥
नाचवितांति विद्याधरी : मयूरां तें ॥ ३४० ॥

कनककमळां चें चारें वाटितु : मदन ॐकारा सारिखे कूजतु ॥
मुग्धागती विलासां सराऊं देतीं : राजहंसां ॥ ३४१ ॥

आंगिचेनि सुगंधपणें : कस्तुरीमृगें सीं करौनि साजनें ॥
उमानिती डोळेंआं ची वडीलपणें कृष्णकुमरी ॥ ३४२ ॥

आंगणां चें नि चोखाळपणें : प्रतिबिंबली तारां-गणें ॥
तिअें फुलें भणौनि शिहाणें : वेचों धांवंतीं ॥ ३४३ ॥

पार्जातकां चां उद्यानीं : कृष्णविरहें तातलिआं कामिनीं ॥
तिआं विजीजतीं गाभवनीं : कापूर केळीं चां ॥ ३४४ ॥

ऐसीं राउळें पाहिलीं : मग साउमां दृष्टीं सूदलीं ॥
तंवं सु-धर्म्म-सभा देखीनिली : यादवा चीं ॥ ३४५ ॥

जेथ चिंतामणी चें दळवाडें : उमानुनी दीर्घे सपिंडें ॥
उभिलें बहुतें कोडें : विश्व-कर्मेनीं ॥ ३४६ ॥

सुरेख खांबु कळासे : उंभ्डविलें बहुतें सायासें ॥
कामा चियां कोंवळीकाशा दिसें : मनोहरू ॥ ३४७ ॥

तेथ यादवां ची स्थानी बैसीनिली: जे कृष्णनाथें श्रृंघारिली ॥
भणउंनि इंद्र-सभा जिंकिली: बरवें पणें ॥ ३४८ ॥

तेथ गातीं वातीं : वाणितीं वाखाणित्तीं ॥
दिसतीं पात्रें नाचतीं : मेणिके ऐसीं ॥ ३४९ ॥

वक्रे वार्त्तिकूं : रसाळें पुराणिकूं ॥
विडंबती तार्किकूं : महाविद्यांतें ॥ ३५० ॥

साहित्याचेनी परागें ऊंटिजें : श्रृंघाराचनि पाणिअें न्हाणिजे ॥
तें कवित्व कानीं आइकिजे : महाकवींचें ॥ ३५१ ॥

निगुति तालांचां विदांनी : पुताळिआं नाचती वळनवाहंनी ॥
उंपत्रिपा गातीं गाणी : एकाटिकियां ॥ ३५२ ॥

थापटें मळिवटें : वाहाणधरूं दीवटें ॥
आळि बोलैति धाकुटें विदावंती सी ॥ ३५३ ॥

हडपी चवरधरूं : भांडारी खाजे-करूं ॥
गुपितिअें जुआळि-कारूं : मातुसांगितें ॥ ३५४ ॥

कन्हेन्हीं श्रृंघारकरणी : फुलबडवे हाति-साहानी ॥
रायां श्रीचक्र-पाणी : जवळिकें असेंति ॥ ३५५ ॥

आपुलेंनि अ-मोलेपणें : भुंजिती ढिली गाजनें ॥
ते उंळगे सीं सांतवं राणें : श्रीकृष्णराया चिअे ॥ ३५६ ॥

जेयां जगीं खांडेश्री गाजे : विरश्रियेचें डौंडिचें वाजे ॥
ते उंळगेति श्रीमंत राजे : यादवरायां तें ॥ ३५७ ॥

शार्ङ्गधरा चेनि बळें : येंति स्वर्ग मृत्यु पाताळें ॥
ते यादवु भंवंतें बैसीनिलें : चहूं कडे ॥ ३५८ ॥

खांडेयां चेआं राज्यधरां : ऐसिआं साटि-लक्षुकुमरां ॥
ॐळगें श्रीचक्र-धरा : राया चिंअे ॥ ३५९ ॥

जाळौनि दैत्यांचें बीज : जेयां वाइलें राणिवे चें भोज ॥
तो ॐळगिअें जेवणिअे-भुज : राॐऊग्रसेनू ॥ ३६० ॥

डाविअे भुजें राम वसुदेॐ : मागीलि कडें सात्यकी अक्रूरदेॐ ॥
भक्तशिरोमणी उद्धवदेॐ पुढीलीकडें ॥ ३६१ ॥

नवरत्नीं डवरिलें : गिरीदूर्ग झळाळिलें ॥
तेवि सिंहासनु मिरविलें: ठीकलगूं ॥ ३६२ ॥

तेथ दानवां अडदरूं : नागार्जुना चा दातारू ॥
देखिला श्रीचक्र-धरूं : वीरचूडें ॥ ३६३ ॥

तेयां निरौपमा परब्रह्मां : जरि दीजैल्रु उपमा ॥
तरि कोपतील आह्मां : ब्रह्मविदूं ॥ ३६४ ॥

परि जाणतां उपसाहावें : बोलां चें पाणि-पद निहाळावें ॥
वाणिअे चें प्रमेअें पाहावें : नीकिआं परि ॥ ३६५ ॥

बोलु तरि नव्हतीं नीकें : फुन वाणितां परब्रह्म नेटकें ॥
रसूं झेलिजे कवतिकें : हातां वरीं ॥ ३६६ ॥

परमानंदा ची फळीं : चैतन्यें घडिलीं ॥
ते केवि वाणिजे बोलीं : श्रीकृष्णमूर्ति ॥ ३६७ ॥

महामोहा चा पाटणीं : सांवांवेयां सांवनी ॥
तें परब्रह्म वेठलें धरणीं : अ-मोलपणें ॥ ३६८ ॥

रूपाचिआं भूली : जेआं लक्ष्मी वालभैली ॥
बळीआं धरूं रीगाली : अव्हेरितां ॥ ३६९ ॥

श्रीकृष्णां चां जांधिवां होइजे : तरि लावण्या चें पडप लाहिजे ॥
भणऊनि मदनु सादैजे : लेंकुरूंपणा लागी ॥ ३७० ॥

देखौनि रूपुं सावळें : वैराग्य काम-कळां पाल्हैलें ॥
पुरुषां उपजेति डोंहळें : कामिनीपणा चें ॥ ३७१ ॥

देखौनि श्रीमूर्ति उघडी : ब्रह्मविद्या डोळें मोडी ॥
मुक्ति धांवे उघडी : पाठोंवाठीं ॥ ३७२ ॥

आंगा चां मेळाऊ देखिजे : तरि मदना ची कुरवंडी कीजे ॥
लावण्या चे उतरीजे : निंबलोण ॥ ३७३ ॥

पांची चेनि रसें : परितिलें इंद्रनीळां चे घोषें ॥
फुन पांता नव्हती सरिसें : आंग कांती सीं ॥ ३७४ ॥

तमाळां चे ढैंसें : एकांति होती हसासे ॥
फुन कोवळीकूं न दिसें : निहाळितां ॥ ३७५ ॥

अतसी-पुष्पां चें झेलें : होतीं सु-नीळूं कोंवळें ॥
फुन ते हीं परिमळें : ऊणें दीसतीं ॥ ३७६ ॥

नीलोत्पला चिअें माळें : दीन्हलें कस्तुरिअे चें काळें ॥
तऱ्हीं सौरभ्यूं आगळें : आंग श्री कृष्णाचें ॥ ३७७ ॥

रातोत्पलां ची पांकोळी : चैतन्यरंगी चुभळैली ॥
तेवि चरणकमळें मिरवलीं : गोपिनाथां ची ॥ ३७८ ॥

संसारा चां व्याळवखां : उदैजतें सूर्य्यबिंब देखा ॥
कीं पालवी ब्रह्म-सुखां : अंकुरैलीं ॥ ३७९ ॥

कीं कुंकुमें रावीलिया : आनंदा चियां कापडगादियां ॥
कीं रंग-दळां चाउरियां : चैतन्या चियां ॥ ३८० ॥

कीं तें मुक्ती चें वश्यकरण : कीं ब्रह्म-विद्यें अनुरागा चें ध्यान ॥
कीं चरतें मोक्षनिधान : मोहांधकारीं ॥ ३८१ ॥

महापापां चें डोंगरूं : भेदावेया अती खडतरूं ॥
तैसें दिसें वज्रसुन्दरू : सु-लक्षणीकूं ॥ ३८२ ॥
जें योगियां चें जीवन : ब्रह्मविद्ये चें जन्मस्थान
तें सुरेख दिसें चिन्ह : पद्मसुद्रे चें ॥ ३८३ ॥
जेयां चां देखौनि उमाळा : पळे महामोहा चा पाळा ॥
तो ध्वजू ढळाळा : सरळू दिसें ॥ ३८४ ॥
शोधुनी संसारा चा आवासु : वरि काढी ब्रह्मविद्ये चा मोसू ॥
तो वर्णू अंकुशू : कवन जाणें ॥ ३८५ ॥
शोभे उर्धरेषा वेह्लाळ : जैसी देवां ची भार सांखळ ॥
ना ते खोलवाट मोवाळ : ब्रह्मविद्ये चीं ॥ ३८६ ॥
जरि चैतन्यां पालवीं नीगती : वरि तारांगणें फुलेंती ॥
तरि तें नखें उपमीजेती : श्रीकृष्णाचीं ॥ ३८७ ॥
गाजता कलरवीं : अरी वधूं चें वैधव्य पढवी ॥
तो तोडरूं घवघवीं : वामचरणीं ॥ ३८८ ॥
मुक्ति चियां पिकां दोषें : ब्रह्म पोटरिआं आलें जैसें ॥
जंघाद्वयें तैसें : गमलें मज ॥ ३८९ ॥
आनंदा चिआं केळीं : जरि दिसातिआं एकीं वेळीं ॥
तरि मांडियां ची जाऊळी : उपमीजेती ॥ ३९० ॥
आधीं ची जघनें अचाट : वरि तारुण्यें जालें धनवट ॥
भणऊनि उपमातुक मठ : जगा माजी ॥ ३९१ ॥
कनककांती चें कालें : जेयां वेळोंवेळीं दीह्लें ॥
तिअें वेढिली पातळें : सोनेंसळीं ॥ ३९२ ॥
नीळ्यां ची मोडी बांधिली : ब्रह्मरसा ची खेडकुळी ॥
तेवि नाभि मिरविली : निऱ्हां रवोल ॥ ३९३ ॥

जरि माजा सीं मोटका चि आऊ : तरि चराचरां कैसा भाऊ ॥
परि तो माव्रियां चा राऊ : भणऊनि घडे ॥ ३९४ ॥

कैवल्ययंत्रा चा उद्धारू : करावेआं रेखां चां विस्तारू ॥
तैसा दिसें अनुकारू : वळीत्रयां चा ॥ ३९५ ॥

तारुण्य पाठारुनीं उतरीनिली : लावण्या ची झळाळी ॥
तैसीं रोमावली पढियासली : मज पांतां ॥ ३९६ ॥

पांतां वक्षस्थळु गंभिरू : मीं भणे कैवल्यसरोवरू ॥
भणौनि मुक्तावासु निरंतरू : तेथें चि दिसें ॥ ३९७ ॥

तेजा चेआं आंळवना : जेआं बारां हीं सूर्य्यें आंकना ॥
तेआं कौस्तुभा चें भूषण : निर्‍हां साजे ॥ ३९८ ॥

रविमंडळा भवंती : जरि तारागणां ची ऊ्वनी दीसेंती ॥
तरि एकावळीं उपमीजेती : कौस्तुभा जवळीं ॥ ३९९ ॥

दिग्गजा चिआं मोहाडा : जरि आनंदा चिआं होंति दोनि सोंडा ॥
तरिं श्रीकृष्णा चिआं भुजांडा : उपमा कीजेती ॥ ४०० ॥

सुरंग लोहिवे : कैवल्यतरू चे पालवे ॥
तैसें दीसती बरवे : आघात श्रीकृष्णां चे ॥ ४०१ ॥

अशोकपालवां सेवटीं : केतकीदळें दीसतीं धाकुटीं ॥
तर्‍हीं उपमा नव्हे गोमटी : नखां श्रीकृष्णां चियां ॥ ४०२ ॥

मुदियां चे हीरे : आंगुळियां तेजा चे वानसरे ॥
करितांति बिरारें : एकमेकें सी ॥ ४०३ ॥

मोतियां चे दुसरें : सरळा चेंनि घसरें ॥
धुमूंकसे हानतीं गजरें : मनकटां वरी ॥ ४०४ ॥

अनंदा चिआं पाचिखंडा : केला लावण्या चा करंडा ॥
तैसा कंठ उधडा : मिरवतुसें ॥ ४०५ ॥

जगा चे डोळें : भुंजती रूपा चे सोहळे ॥
तें श्रीमुख सांवळें : वर्णवे ना ॥ ४०६ ॥

आंग चेनि दळभिडें : पांतां चंद्रबिंब थोबडें ॥
भणऊनि श्रीमुखा चेनि पाडें : वाणौं न अें ॥ ४०७ ॥

नीळेयां चा झळंबुका : घोळिला चंद्रिका ॥
तऱ्हीं मुरारी चेआं श्री-मुखां : उपमा नव्हे ॥ ४०८ ॥

मर्गजामणी चें घोंषें : कमलकांति होति हसासें ॥
तऱ्हीं श्रीकृष्णमुखें सीं सरिसें : करौं न अेति ॥ ४०९ ॥

लावण्यसुधा घोळिला : तो परमानंद आलखैला ॥
भणौनि मुखरसूं आगळा: तेंथ चि दिसें ॥ ४१० ॥

आंगि चेनि कसमसा ठें : रसरंगा चां पूर पुटे ॥
तिअें बरवी ऊष्टपूटे : बिंबफळां पासौनी ॥ ४११ ॥

पवळेयां चेआं प्रभा : वेढिला चंद्रा चा गाभा ॥
तऱ्हीं स्मिता ची शोभा : अधिकु दिसें ॥ ४१२ ॥

पद्म-रागा चिआं ज्योतिं : जऱ्ही मुक्ता-फळें रापती ॥
तऱ्हीं उपमा दंत-पंक्ती : देऊ न अें ॥ ४१३ ॥

अ-मृता चां कल्लोंळीं : चंद्रकळा झळंबैली ॥
तऱ्हीं वाचा आगळी : दिसें सु-रसपणें ॥ ४१४ ॥

मायाजला चिआ ऊला : परमानंदू आंकुरैला ॥
तैसा मिसूर भीनला : सु-लक्षणीकुं ॥ ४१५ ॥

परश्रिअे चा राणिवसा : स्रष्टेनि घडिला जैसा ॥
नासा-दंड मिरवला तैसा : मज गमलासे ॥ ४१६ ॥

मुक्तिवनितें दोषें : ठेलें इंद्रनीळा चे आरिसे ॥
तेवि कपोलद्वय दिसें : झळफळींतू ॥ ४१७ ॥

सुनीळु घोंसाळें : निऱ्हां शोभेंति डोळें ॥
जे पुरविती मोक्षा चे सोहळें : योगियां सीं ॥ ४१८ ॥

कटाक्षा ची अणी : रूपे हृदयपाषाणीं ॥
तऱ्हीं नव्हें ची धावुनीं : मन्मथा सी ॥ ४१९ ॥

मुक्ती चा दारवठा : उघडांवेआं कुचिआं वंकटा ॥
तैसिया भवै सानटा : मिरवतांतीं ॥ ४२० ॥

नीळा निघोटूं : सौंदर्या चा सेजवटूं ॥
तेवि दिसें बरवटूं : लल्हाटुप्रदेशू ॥ ४२१ ॥

नगा चेआं लावण्या यावांका केला : कीं नेत्रचकोरां चारा घातिला ॥
तैसा अर्धचंद्रकारू टिळा मिरविला : हरिचंदना चा ॥ ४२२ ॥

जेथ सौभाग्य मातलें : लावण्य हिंदोळा खेळे ॥
ते लंब कर्ण-मूकुलें : ने तापसि ॥ ४२३ ॥

मौक्तिकां चे झुंळुंबकें : तेजा चेनि उरूकें ॥
कवळी देतांती कत्रतिकें : कपोलकांती सीं ॥ ४२४ ॥

आनंदनिधानां वरी बैसीनिलीं : मोक्षभुजंगा ची पुटिकाळी ॥
तैसी देहुडी वेणी खोविली : आठाइती ॥ ४२५ ॥

वाटोगरीं चांपैलें : पार्जातकें घाटौलें ॥
बिरुली केतकींदळें : सिरोवींरी ॥ ४२६ ॥

ऐसें रूप नेपाळें : देरवौनि चैतन्य भुललें ॥
मग दर्शन केलें : शार्ङ्गधरें सीं ॥ ४२७ ॥

उद्धवदेवा चां पालखती वरौन : घेतिलां तोडरा चा श्रीचरण ॥
शिरां वरी ठेविला धरौन : घडी एकी ॥ ४२८ ॥

सरळा चेनि हातें : उचलौनि माथें ॥
चाउरी घालविलीं जगन्नाथें : बैसावेयां ॥ ४२९ ॥

मानुष्यपणां मानु देतूं : पांडवां तें पुसें अनंतू ॥
यऱ्हवी तो सर्वज्ञ-नाथू : जगामाजी ॥ ४३० ॥

तंवं ह्रासौनि वीरचूडु बोलिला : तूं सर्वज्ञ-राउ गौपाळा ॥
असेंसीं जगां वेगळा : सूक्ष्मरूपें ॥ ४३१ ॥

जें परब्रह्म परिपूर्ण : निराकारू निर्गुण ॥
सनातनु स्वयंप्रमाण : तूं देव-रायां ॥ ४३२ ॥

स्थूला सूक्ष्मा वेगळा : तू कैवल्या चा पूतळा ॥
तेनें तुआं मायां वेषू धरिला : कृपावशें ॥ ४३३ ॥

तुआं यादवां चेयां कुळा : दैवां चा दीवा लाविला ॥
पितेंपणा चा मानु दीन्हला : वसुदेवा सी ॥ ४३४ ॥

तुआं गोकुळीं चां भानुवसीं : दैत्यां चीं मोरांडी कसुकुसीं ॥
खाजेयां दीन्हली कृतांता सी : धाकुटेंपणीं ॥ ४३५ ॥

तुआं राया श्रीचक्रपाणी : मथुरें केली रीगवणी ॥
तै जेउं सूदलें रंगणीं : महाकाळां सी ॥ ४३६ ॥

रजकां चें हातवणीं सूदलें : गजमांसाचें वरण वाढिलें ॥
तोडौनि मांडे घातलें : चाणौरुमुष्टिकां चे ॥ ४३७ ॥

कंसा जा तूपभातु : जेउंनि ठेला खाखातु ॥
मग तेविसां अक्षौणी चा ताकभातु : वरी वाढिला ॥ ४३८ ॥

थोरु कांडां च्चां घाइं मातला : डाडातु पुढें धावीनिला ॥
तो जरा-सूत घायां आला : परि हाणसी चि ना ॥ ४३९ ॥

काळयवना चा उगारू : पुरडैला देतुसें ढेकरूं ॥
मग भणे श्रीचक्रधरू : विजया हो ॥ ४४० ॥

न घडे चि कव्हणें बोलें : तेह वेळीं जुंझां चें देज दीन्हलें ॥
मग कन्यारत्नु प्रणिलें : भीमका चें ॥ ४४१ ॥

शरांटी पिढौनु : तों हीं खांडेंसूनु ॥
घेतिला मानु : शिशुपाळा चा ॥ ४४२ ॥

चगळितां निबरू : थोर कांडां चा उभगरू ॥
वाढौनि केला पाहोनरूं : मागधादिकां चा ॥ ४४३ ॥

कौंवडन्यापुरीचां पाणिवथा : रुकुमियां चा भादुरैला माथा ॥
तुआ कापुडी केला जगन्नाथा : धारातीर्थींचा ॥ ४४४ ॥

अबिका चिआं माडा जवळीं : खारत्राति भूतावळीं ॥
तै तुआं आवुरिवं केलीं : दैत्युमांसा चीं ॥ ४४५ ॥

मडौरा चां बंबाळी : योगिनीचक्रा चां गोंदळीं ॥
काळ-रात्रीं उदो भणविली : रणा माजी ॥ ४४६ ॥

गरुडा चें करौनि वारिकें : दाटौनि आलासी कवतिकें ॥
मग जुंझ घेतिलें नीकें : भौमासुरां सी ॥ ४४७ ॥

गरुडा चां पाखवारां : भवैधुडां चा चाकवारा ॥
तै घाईं भंवतेयां वीरां : मुक्ती दीह्नली ॥ ४४८ ॥

भौमासुरा चेनि शिसाळें : रणदेवतां ढवसाऊं केलें ॥
मग निधान काढिलें : स्त्रीरत्नां चें ॥ ४४९ ॥

रुधिरा चें करौनि आवारिवं : आठै प्रलअे-भैरवं ॥
रौंद्रा करी ताण्डव : तुआं नाचविलें ॥ ४५० ॥

मारौनि बनकरूं धाकड : आणिलें पार्जातका चें झाड ॥
तैं पुरविलें कोड : सत्यभामे चें ॥ ४५१ ॥

कोपें इंद्रु आला हातुपीटीं : तो खांडेया चा उपटीं ॥
पिटौनि सुदैला धुळीं-कोठीं : अमरांवती चां ॥ ४५२ ॥

शोणितापुरी चां आखुरीं : नारजा चां अधोधारीं ॥
वरीखतेयां बानासुरां वरीं : कोपिलासी तूं ॥ ४५३ ॥

रुधिरा चां पल्हा चीवडौनी : धडांचें बौलें करौनी ॥
सधनु मांडौ घालौनी : थोरकांडा चें ॥ ४५४ ॥

धुधुवातें कुठारे वेऱ्हीं : बानभुजां चीं करौनी कांडौरीं ॥
तोरण भरिलें महाद्वारीं : मंडपा चां ॥ ४५५ ॥

रणतुरां चां गजरीं : गजरोंडा चेआं पाटा वरीं ॥
अनिरुद्ध नोवरा मुरारी : तुआं बैसविला ॥ ४५६ ॥

बाना चेनि कैवारें : कासिलें कर्पूर-गौरें ॥
तो फुफुवातेंनि जृंभणास्त्रें : पिशा केला तुआं ॥ ४५७ ॥

तूं वैरी-वन-कुठारू : शरणागतां वज्र-पंजरू ॥
उदारदेॐ दिक्षा-गुरू : तूं तें भाणिपैं ॥ ४५८ ॥

तूं पांडवां चा वेळाइतू : ऐसें आइकीजे जगा आंतु ॥
तरि पुरवावा मनोरथु : युधिष्ठिरा चा ॥ ४५९ ॥

प्रेमें आगळियां भक्ती : तो तुमचें चरणु चिंतीं ॥
तेआं धर्मा ची विणती : अवधारिजें ॥ ४६० ॥

स्वस्तिश्री चक्र-धरा : माझी विणती अवधारा ॥
एऱ्हवीं यावें दातारा : यागासिद्धीं लागी ॥ ४६१ ॥

नमस्कार करौनु : क्षेमालिंगनु देॐनु ॥
बालावेया पंडु नंदनु : श्रीकृष्ण रायां ॥ ४६२ ॥

अरि-राअे विभांडावे : मग राजैं-सूययागां यावें ॥
ऐसें माझे पुरवावें : मनोरथूं ॥ ४६३ ॥

सांडौनि सकळीं काजें : देवें एथें करावें बीजें ॥
ना तरी राणीवु सांडिजे : मज दिजें अनुज्ञा ॥ ४६४ ॥

ऐसेंयां सु-वर्मां बोलां : सर्वज्ञराॐ मानवला ॥
मग संदेहा मानु दीह्नला : इच्छावशें ॥ ४६५ ॥

मग देऊ भणे बलिभद्रा तें : दोंनि कार्यें प्रस्तूतें ॥
कवण कीजे तें निरुतें : सांगा तुम्हीं ॥ ४६६ ॥

तंवं बलिभद्रें भणातिलें : आम्हां हें चि प्रत्यआ आलें ॥
जें चालावें सर्वदळें : शिशुपाळा वरीं ॥ ४६७ ॥

जें चैद्यें केलें : तें आधी ची नारदें सांधीतिलें ॥
तें देऊ कांईं विसरिलें : राणें पणें ॥ ४६८ ॥

व्याधी आणि वैरी : अें कोंवळीं जंवं ची वेंन्ही ॥
तंवं तोडावी सर्वप्रकारीं : जाणतेनी ॥ ४६९ ॥

वैरी सरिसा जीअे : तरि निद्रा कैसेनि अे ॥
लांबतिअे सुरिअें : केवि लाजिजे नु ॥ ४७० ॥

राया राणिअें चा जाला : जरि घे लोहा चा कांटाळा ॥
तरि क्षेत्रियां चेआं कुळां : बोलु लागे ॥ ४७१ ॥

पाअें धूळि रगडे : तरि सळें माथेंआं चढे ॥
तेआ ही वैर साधु न घडे : अचेतना सी ॥ ४७२ ॥

आगीं हातु लाऊ भीजे : पाणियां तरि मीठी दीजे ॥
भले तेन निकें मारिजे : तिहीं लोकीं ॥ ४७३ ॥

भणऊनि असानेयां होइजे : पुढां भाटुं धाडिजे ॥
पाठीं आपण जाइजे : अ-मोल-पणें ॥ ४७४ ॥

ना तरि राणीव सांडावी : कापडें भगवांवीं ॥
वारानशी सेवावी : तापसां होऊनी ॥ ४७५ ॥

तंवं भणे यादवनरेंद्रु : नीकें भणताअे बलिभद्रु ॥
आह्मां हा चि मंत्रु : प्रत्यया आला ॥ ४७६ ॥

उद्धवदेवा तुमचा मतीं : यादवां ची राणीव धडौती ॥
तरि काइ करावें प्रस्तुतीं : ते तुम्हीं वदा पां ॥ ४७७ ॥

तंवं भणे उद्धवदेॐ : जी तूं सर्वज्ञराॐ ॥
तुआं नेणीतिला ठाॐ : कवनु असें ॥ ४७८ ॥
आम्हीं असों मंत्री-पणें : खाॐ राउळींचीं जेवनें ॥
भणॐनि कांहीं एक बोलनें : तऱ्हीं लागे ॥ ४७९ ॥
न मिळतां नायकुवडी : दळां ची आइती थोडी ॥
भणॐनि चालिजे दडवादडीं : हा मंत्रू चि नोहे ॥ ४८० ॥
अवंदाचां काळीं : मोटकी राणीव सांसीनिली ॥
सवें चि विग्रहो पर-मंडळीं : कवणें बोलें ॥ ४८१ ॥
शिशुपाळां जवळां : असें रायां चा मेळा ॥
जरा-संदू एकला : कवणां न पुरें ॥ ४८२ ॥
जरा-संदा चा घाअेवारा : लागीनिला यादवां वीरां ॥
तो आझूइं भेदारा : फिटे चि ना ॥ ४८३ ॥
ऐसें वदतां कोपाल एऱ्हवीं पुढें पळाल ॥
गिरिं पर्वतीं लंघाल : देंखतु खेॐ ॥ ४८४ ॥
कीरू तुंम्ही वरि चि धाकुड : ते तऱ्हीं निऱ्हां भेड ॥
तुम्हीं चालिजे हें मत कुड : अ-पाडू कीं ॥ ४८५ ॥
हातीं चिआं मोहडा : सिंहो करी रगडा ॥
तो नुचली चवडा : कोल्हेयां वरी ॥ ४८६ ॥
आंगिचेनि धुधुवाटें : वायो न मोडी तनकुटें ॥
आडमोडें करी खरांटे : महातरू चे ॥ ४८७ ॥
दिवाकरां ची धाडी : साइलियां तें न मोडी ॥
कसकसां रगडी : अंधकारा तें ॥ ४८८ ॥
तो धवळूं असें आवेशला : तेयां वरी तुम्हीं राअे चाला ॥
तरि रोकडी अवकळां : हे चि एकी ॥ ४८९ ॥

भणऊनि आपणेयां उखेंडी न पडे : जीतु शिशुपालु हातां चढे ॥
जरी ऐसा मंत्रु घडे : तरि तो चि कीजे ॥ ४९० ॥

तूं धर्मा चा कुढावा : तरि तेयां चा अडलाऊ करावा ॥
अवदशा यां पांडवा : एऊ नेदावी ॥ ४९१ ॥

आजी तुझेंनि बळें : जीणांवीं राज्यें-कुळें ॥
मग यज्ञ-तरू चीं फळें : हातें तोडावीं ॥ ४९२ ॥

भणऊनि वऱ्हाडिकें जाइजे : तेथें मिळतीं सकळें हीं राजें ॥
अघवीं होतींल काजें : अनायासें ॥ ४९३ ॥

दिग्गजा पांडवां करवी : रिपूं चीं अवधी तोडावी ॥
कांटियां कांटी झाडावी : बाहिरी वाहिरी ॥ ४९४ ॥

भीमसैना करविआं मागदतरू चिआं चिप-तळिआ ॥
प्रताप-भानवसीं जाळाविआ : दु-फोडी करौनि ॥ ४९५ ॥

अग्र-पूजे चां वेळीं : शिशुपाळु वदैलु गाळी ॥
तेह वेळीं तेआ ची देआवी बळी : महा-काळा सी ॥ ४९६ ॥

धुर पडलिआं पळती : ऐसां ही नाइकवडीं परतेतीं ॥
तरि खांडेनिं भडाडु देतीं : पंडू-पुत्र ॥ ४९७ ॥

मंत्रियां दीक्षा-गुरू : ऐसें बोलिलां उद्धव-वीरू ॥
तंवं केला जअेजअे-कारू : सकळजनीं ॥ ४९८ ॥

राम-कृष्ण मानवले : भणैति उद्धवा तूं आमुचें डोळें ॥
राज्य भुंजो तुझेंनि बळें : तिहीं लोकीं ॥ ४९९ ॥

मग एणें ची विचारें : नागार्जुना चेनि दातारें ॥
पालानवीले श्रीचक्रधरें : यादवां करवां ॥ ५०० ॥

जो अरी-रायां चां घरीं : करवी सांवरासांवरी ॥
तो निशानु लागीनिला महा-द्वारीं : राउळींचा ॥ ५०१ ॥

नायकां चां आवारीं : काहाळियां चां गजरीं ॥
मेळविले थोवे-कारीं : कडवां पाशीं ॥ ५०२ ॥

घनथीरू भणतु : खाखांळियां तें पुवाळितु ॥
उपलानें निगालें बरवंतु : हाटां माजि ॥ ५०३ ॥

उखरडा धाधाविलें : मंडळीकु निघालें ॥
सवे सारीतु पातीनिलें : दंडनायका पाशीं ॥ ५०४ ॥

सेजवळ सहवासी : आंगवळे-कारू विश्वासी ॥
मीनती दांडियां पासीं : राउंळीचेयां ॥ ५०५ ॥

जेयां चें देखौनि बरवे-पण : उच्चैश्रवा करी कडिवळ-पण ॥
तेयां घोडेआं चें साहान : पालानलें ॥ ५०६ ॥

तेजियां चीं लक्षणें : निरौती कवणु जाणें ॥
जेयां वरी परब्रह्म आमोके-पणें : राउतै करी ॥ ५०७ ॥

रूपा चेनि आहे : ऐरावतु पाणि वाहे ॥
तें हातीं गुढरिलें लवलाहें : महावंतीं ॥ ५०८ ॥

काळलोहें डवरिलें : वज्रवाटीं बांधिलें ॥
ते रथूं साजिलें : कनकतुंब ॥ ५०९ ॥

चंद्रतारां आंगिं टोपरें : केलेसें शार्ङ्गधरे ॥
मग भद्रा चेनि महा-द्वारें : उभे ठेलें ॥ ५१० ॥

तंवं मना-पासौनि वहिला : वारू पालानिला ॥
वारुडेनी मेळविला : झडकरौनी ॥ ५११ ॥

पाउडां पाउं घातिला : तंवं भणतिलें सांसोंला ॥
गाढी वागुजी गोपाळा : राणें-राया ॥ ५१२ ॥

भाटु पढंती ब्रीदावली : शौर्य सूरसेना चां कुंळी ॥
काह्नो जाणिजे भू-तळीं : वसुदेवा चा ॥ ५१३ ॥

पर-ब्रह्म-गिरी-दुर्गाचा राऊ : शरणागतां सीं नाहो ॥
दानवघनघाऊ : वैरी-वन-कुठारू ॥ ५१४ ॥

बापु राऊत वोठ्ठिला : जीतेयां शिशुपाळा चा अमोला ॥
अ-सहानु जगीं जग-दळां : चौहातु मल्लु ॥ ५१५ ॥

भुजां बळें महा-काळू : रिपू दळां कोह्लाळू ॥
अदैव वडवानळू : दानवां सी ॥ ५१६ ॥

असुर-कुळ-साळिवा : रणरंगां बंबाळ दींवा ॥
वैरीवनां वनवा : तूं तें भणीपै ॥ ५१७ ॥

मागद-राओ-विभांडू : कंसादि-राओं-खांडे-भडाडू ॥
राया पासौनि राऊत वाडू : हें ब्रीदें सत्य केलें ॥ ५१८ ॥

आधीं पूर्वजीं जोडिजे : मग आंकुनें पढवीजे ॥
ते राओं वाणितां लाजीजे : तुज पुढें ॥ ५१९ ॥

तुआं आपुलां भुज-बळीं : अरी रायां चीं ब्रीदें विभांडिलीं ॥
भणऊनी जगीं ब्रीदावली : एका तूंजे ची साजे ॥ ॥ ५२० ॥

भाटां तें उचितीं वारितू : घोडेयां चां स्कंदु थापटीतू ॥
निघाला यादवनाथू : हळूं हळूं ॥ ५२१ ॥

तंवं डौंडी ची वीर-घंटा : सनसनितीं जेंगटां ॥
वाजितांती एकदटा : एकें वेळें ॥ ५२२ ॥

तरारिंती काहाळां : घुरघुरितीं टिवाळा ॥
रणभयासुरां ढोलां : मेरू थरारी ॥ ५२३ ॥

दुमदुमिंती बोंब्रतिआं : घनघनिंतीं तांबकिआं ॥
खिनखिनितीं तुररिआं : खरासिंगे सी ॥ ५२४ ॥

डमडामितिंआं हुडुकां : कडकडितिआं शंखा ॥
वाजतां ब्रह्मगोळकां : तढा पडतुसें ॥ ५२५ ॥

ढवस पढहो भेरी : राऐ गिडागिडिआं रणमोहरीं ॥
निशानां चा गजरीं : आकाशु फुटे ॥ ५२६ ॥

फडफडिती उपरगूढिआं : फ़ुजितीं वाघवडाइआं ॥
डोलतीं पढवळकाठिआं : चहूं कडें ॥ ५२७ ॥

लफलफीति महापड : फगफगितीं टकें निवाड ॥
फेंकारते कूंचें जंवदंड : दळवेंयां चें ॥ ५२८ ॥

नीगतां यदु-टिळकां : मिरवताऐ सातिआं चां धुधुका ॥
जैसें चालतें नंदनवनु देखा : अंतराळीं ॥ ५२९ ॥

राउळां पुढें वाढत : राजवाहान पुआळित ॥
हो हो भणतां राउत : आखूडती ना ॥ ५३० ॥

तेथ गाढिया वागा : राउतें करीति श्रीरंगा ॥
रेवांतकू सांवळेयां आंगां : लोण उतरी ॥ ५३१ ॥

शौर्यसागरा चा वळसा : वेढया रीगताऐ तेसा ॥
हो हो भणतां सेंभ जैसा : तेवि राहातुसें ॥ ५३२ ॥

नीगतां सथावां गतीं : आसूडितां दोहों-हातीं ॥
चरचरां बासां फांटतीं : कानसुले वेऱ्हीं ॥ ५३३ ॥

उफाड जोड करीतु : पांचविऐ धारें वावडतु ॥
राऐकियां हाटांतु बरवंतु : एतांतीं ॥ ५३४ ॥

घननीळू सांवळा : पर-ब्रह्मां चा पूतळा ॥
पाहावेया गाऊं आला : उलथौनियां ॥ ५३५ ॥

गजमदा चिआ चिडनी : निसरतांती कामिनीं ॥
सांवरितां नेसणीं : हासें होतुसें ॥ ५३६ ॥

भूगोळकां चां रवनीं : मांदी न माऐ मुडपधसनीं ॥
तेआं कटकां चा नीगतां दाटनी : केंवी सांगों ॥ ५३७ ॥

निगालेआं यदु–पती : न शोभे ची द्वारावती ॥
जेवी नसद्वी शांती : विवेकें विणु ॥ ५३८ ॥

ना तरि रसें वीणु वाणीं : किं चंद्रे वीणु रजनी ॥
जैसी एकली कामिनी : प्रियें विणा ॥ ५३९ ॥

चालतेयां दळा चेनी भारें : कूर्म्मा चे क़रटें कुसकरें ॥
हटकेश्वरू अडदरे : उन्झेंभेणु ॥ ५४० ॥

वसूंधरा कुबडैली : वऱ्हाया ची दाढ कसकरैली ॥
दांतुखिळी बैसीनिली : आदिशेषा ची ॥ ५४१ ॥

सैन्यें पृथिवी दाटली : तें ब्रह्मयां गाऱ्हाणें सांगौं निगाली ॥
तैसा धुळैरा अंतराळीं : सत्यलोकु वेऱ्हीं ॥ ५४२ ॥

मुदलां धुरां छपन्न कोडी : जेथ संख्या नाहीं नायकवडी ॥
तेथ गज रथु घोडीं : कवण लेखी ॥ ५४३ ॥

चालावेआ सकळ साहान : पृथिवी नाहीं रवन ॥
ऐसें असोस पाळेगण : यादवां चें ॥ ५४४ ॥

जेयां भक्ति अंगु जीवना : जो थोरां हातां चा राणा ॥
तो अक्रूर आंगवणा : पुढां चाले ॥ ५४५ ॥

जो वैरीयां बडिवारू : यादवां पागारू ॥ रघा(?)
तो सात्यकी वीरू : पाठीं सीं चाले ॥ ॥ ५४६ ॥

मामाकंस–मारुणू : जेयां दीह्नला राणिवे चा मानु ॥
तो राउ़ उग्रसेनु : जेवनिअें भुजें ॥ ॥ ५४७ ॥

जो पाताळफर्निंद्रु : कोपें काळाग्नि रुद्रु ॥
तो चाले बलिभद्रु : डाविए भुजें ॥ ५४८ ॥

जेयां जीता जरासंदु तोडरीं : तो दानवां चा वैरी ॥
धुरां चा राउ़ मुरारी : माझारी चाले ॥ ५४९ ॥

लावण्या चीं गुप्त भांडारें : कीं मदना चीं मोहनास्त्रें ॥
तैसीं दीसतीं अंतौरें : यादवां चीं ॥ ५५० ॥

ना तें कामा चे उपलाने : खोललें मीं भणें ॥
ालावेआं धालनें : त्र्यंबका वरी ॥ ५५१ ॥

ब्रह्मधाया गौळनीं हडपिनी चंवरधरणीं ॥
दांडियां चां सुरकौनी : वारिकेआं वरी ॥ ५५२ ॥

पश्चीं आकाश सेइलें : कीं चंद्रा चें दळ खोललें ॥
तैसीं तयां चीं मुख-कमलें : दीसती सैंग ॥ ५५३ ॥

अनंगा चिआं खलौरी : भेण लपवीलियां त्रिपुरारी ॥
तेवीं कुमरुं कुमरीं : दिसतिं धायां जवळीं ॥ ५५४ ॥

असोंत हें बोल : चालतां जालें नवल ॥
ते आतां सांगिजैल : श्रोतेंयां सीं ॥ ५५५ ॥

।मिळतां पताकां फरारें ढळतु साबळां चीं चवरें ॥
सांवळेयां लाहा चेनि आंधारें : कांहीं सुजावे ना ॥ ५५६ ॥

हातींचे भारु चालतां : रथां वरी रथु पडतां ॥
घोडेयां चां खुर विजातां : मानुषें ची पां आतुली ॥ ५५७ ॥

तंवं हडपिनी वारिकी दुआळिलीं : तिअें पुढिलां बरिआं बुजालीं
चांपे-गोरटी आंगें उघडी ठेली : पुन पडती चि ना ॥ ५५८ ॥

श्रृंगारे जांभै दीहली : ना तरि मदनें बुंथी फेडिली ॥
तेवीं वरौतीं पारवीं उचलिलीं : चोळियां चीं ॥ ५५९ ॥

तेह वेळीं कुचपर्वता चां घाटीं अुंळघतां डोळें जालें आयेतुटीं ॥
राउते जालें हिपुटीं : वारू थापटती ना ॥ ५६० ॥

तंवं दळवै कोपीनिलें : चाला गा राउते हो भणातिलें ॥
राऊळ जवळिकें पातलें : मागिली भारीं ॥ ५६१ ॥

तेह वेळीं मा- भणौणिन घसें चालतां : दुनी देहुडी आंगें घालितां ॥
घोडे यां राउतां : वेणी पडतुसें ॥ ५६२ ॥

हळूं गा हळूं दाटितीं : भाला आंगां शीरती ॥
पुढील पाइकें रगडती : धीरुं चाला ॥ ५६३ ॥

आगा अे वीर हो आडौनि सरा : उजू हातिअेरूं धरा ॥
पैल कोंतेकारां : जवळिकें चाला ॥ ५६४ ॥

हा हो कां वाढतु : राहा धीरु करीतु ॥
धनु रे धनु भणतु : राऊतें बरवतांति ॥ ५६५ ॥

बापु रायां चां राणा : चालतांअे बहुतीं आंगवना ॥
गुरुवती अगाधुपणा : अधिकु दिसें ॥ ५६६ ॥

असों हें मालतीपुरां जवळें : पुढील उपलाने पातले ॥
तेहीं पाणियां चें लाणें पाहिले : मल्लिकारा लागी ॥ ५६७ ॥

पांनां निरवडी : विश्वकर्मेयां ची उभनी साबडीं ॥
भणऊनि ते गाडेकारु होंडी : जीणवती ना ॥ ५६८ ॥

गाडेयां चिआं निहटी : घातली बह्लाळताटी ॥
तयां भीतरीं उभनी गोमटी : कृष्णमेचू ची ॥ ५६९ ॥

खांबु उभितां : चौकतीं मेळवितां ॥
इंद्रनीळां चे पर्वता : तैसें गुढरूं घातलें ॥ ५७० ॥

सरिसे वेळ करित : मौळी चिआ सोलां आसुडित ॥
तनियां तनी लागत : दुसें दीह्लीं ॥ ५७१ ॥

राजगिरी मांडविया : सुरंगा कापड चौकिया ॥
उभितां गडें भोइयां : होडा होती ॥ ५७२ ॥

मांडविया जवळिके : बाण तगरूं तटके ॥
साबरीं घालताती तवकें : कापूर केळीं ची ॥ ५७३ ॥

राऊळ आलें भणऊनि लवलाहें : सिंचणारीं सिंपिली राज-गृहें ॥
आतां बोलने असो हे : देऊ काई करिते जाहलें ॥ ५७४ ॥

जरासंदा चा धायबंधु आगळा : तो उखरडा विभांडिला ॥
तिअे राणिवे चा उगाना घेतला : वीन बैसौनी ॥ ५७५ ॥

आंघोळी देवें पूजा सारिली : आरोगणा स-परिवारीं जाली ॥
तंवं मध्यमु रात्री भरीनिली : मग जाला पहूंडु ॥ ५७६ ॥

पाहातां ची पालाणिले : मोळवण दावें घातिलें ॥
रेवंतका चेनि तळवटें निगाले : हळु हळूं ॥ ५७७ ॥

पेनोंवेणां दळ बहुतें मीनलें : वाटे पाणी तुटलें
तेह वेळीं पाळेंगण केलें : च्याऱ्हीं ठाई ॥ ५७८ ॥

तेथें बहुतें डंबाळें : पांडवूं साउमेयां आलें ॥
तंवं देऊ एमुना पातले : ठाअें ठाईं ॥ ५७९ ॥

भेटलेयां श्रीचक्रधरू : जें सुख पातला युधिष्टिरूं ॥
तें बोलिका व्यासकुमरूं सांगों नेणें ॥ ५८० ॥

स्वर्गुसुख बापुडें : विषयसुख निऱ्हावडें ॥
मुक्तीसुख सावडें : तें पाहौनी ॥ ५८१ ॥

ब्रह्मविद्ये चे दीर्घ डोळें : फुन जें रूप पांता न निहाळे ॥
तें युधिष्टिरें आळंगिलें : नवल देखा ॥ ५८२ ॥

पांचां हीं खेवां खेवीं जाली : फुन अर्जुना ची दैवी आगळी ॥
जेयां वरी दृष्टी उपनली : चैतन्यनाथा ची ॥ ॥ ५८३ ॥

मिळौनि पांडवां सीं देऊ आले इंद्रप्रस्छा सी ॥
तेथिची रचना कैसी : ते सांगौ नेणिजे ॥ ५८४ ॥

लोहा चें काळवरवें पडिलें : फररां आकाशु गवासिलें ॥
दिशाचक्र बहिरैलें : घाईं निशाना चां ॥ ५८५ ॥

नवल गावींची परवडी : केसीं देवां धर्मां ची आवडी ॥
अववां ची लोकूं दडवांदडीं : साउमा आला ॥ ५८६ ॥
भेटलेयां गो-पाळु : होतांअे परमानंदा चा सुकाळु ॥
कडुवा संसारदुःकाळु : दारं नीगतु दिसें ॥ ५८७ ॥
कैसी धूर निहाळ : हातसुटी निऱ्हां नवल ॥
ब्रह्मसुखा चे मोगरसूल : जगां केलें ॥ ५८८ ॥
आलेआं मुरारी : कैसा उच्छाअ जाला नगरीं ॥
तें सांगिजैल्हु बोलीं परिकरीं : श्रोतेयां सीं ॥ ५८९ ॥
पवळेंयां चिआं दृती : जावडे कालअनि नीगुती ॥
घोंसाळा कांकणा चां हातीं : नारीं सडें घालितांती ॥ ५९० ॥
कापुरां चिआं भांजनियां : वाटौनि मौक्तिकां चिआं अडकणियां ॥
तिआं रांगवळीं सूतीं राणियां : चक्रवर्ती चिआं ॥ ५९१ ॥
मौक्तिकां चिआं वेलीं फुललिया : कीं क्षीर-सागरां लहरीं उपलवलियां ॥
तैसियां गुढियां उभिलियां : घरोंघरीं ॥ ५९२ ॥
कामअनि गौरें चांदिनें : उभिलें संध्या-रागा चें रावणें ॥
तिअें मखरें तोरणें : वाणवती ना ॥ ५९३ ॥
हरि-चंदना चिआं वेलीं : कल्पतरू चीं पालवी गुंफिली ॥
तिअें तोरणे भूमीं रवलीं : एंकदटें ॥ ५९४ ॥
वेधा चा वळसा : चैतन्यां चा आट भवे जैसा ॥
पाहावेयां गांअ तैसा : दाटतुसें ॥ ५९५ ॥
रत्नां चिआं चित्र-शाळैया : चिंता-मणी चिआं अवरियां ॥
वळघौनि पाती अंतौरियां : चक्रवर्ती चिआं ॥ ५९६ ॥
लावण्यवेली ची ताटी लागली : कीं श्रृंगारा ची वांठीवं पाहैली ॥
ना तरि घेतांअे उपरडकवळीं : मकरध्वजू ॥ ५९७ ॥

ना तिआं रती चिआं कुळ-देवतां : कीं संभोगसुखा चिआं सरिता ॥
ना तिआं मुहरैलियां चंद्र-लतां : चांदिनेआं चिआं ॥ ५९८ ॥

चंद्र-बिंबा चे फुलैरे : लांबीजेति पांची गरुडोद्गारें ॥
तऱ्हीं मुखें मिरवलीं जालांधरें : उपमूं न एती ॥ ५९९ ॥

एकीं प्रेमें उत्कंठिता: पाहावियां उठीनिलियां असासिता ॥
तियां चें भाउ वाणिता : कवीं सी माथा तुकविण ॥ ६०० ॥

ढाळा चां मोती : मदना चा पंथु सिंपती ॥
तेवि हारा ची विखुरणी करिती : कव्हणी एकी ॥ ६०१ ॥

भेटावेयां लक्ष्मी-पती: मदन-लिंगा सी रत्न-पूजा रातली ॥
तेवि कुच-तटीं हारें घालिती : आणिकी एकी ॥ ६०२ ॥

कस्तुरि चेआं दर्तीं : लिखितांती अनंगा चिआं प्रशस्ती ॥
तेवि कपोळीं पत्रवेली रेखिती : कव्हणी एकी ॥ ६०३ ॥

पुष्पां चिअे सेजें : विसंवला प्राण-नाथु सांडिजे ॥
मग देउ पाहावेयां धांविजे : तो वेध कैसा सांघों ॥ ६०४ ॥

वरौनि कापूर-केळीं : भ्रमरां ची झांक ऊठिलीं ॥
तेवि डोळेयां ची धांव सुटली : श्रीकृष्णा तें पाहावेयां ॥ ६०५ ॥

कीं चांदिनेयां चिआं राशी : नीलोत्पलां ची किळीं फांकली जैसी ॥
सांवळीं दृष्टी तैसी : मज गमली ॥ ६०६ ॥

प्रेम-भरें वेडैली : मनें आलिंगावेयां धावीनिली ॥
तिअें लाजे चां सावासीं भकलिलीं फुन धरिती चि ना ॥ ६०७ ॥

पिंशेयां चे पालवदाटनी : डोळेयां चिआं वागा उऱ्ढौनी ॥
लावण्या चिआं लोथां बांधौनी : जग जातुसें ॥ ६०८ ॥

ते कांईं वाणौ वेधवती : निर्जिवा पुतळीया पाठीं धांवंती ॥
कामा ची अवस्था दाहावीं निरुती : स्त्रियां होतुसें ॥ ६०९ ॥

चैतन्या ची लुसी : घेतु निगाला हृषीकेशी ॥
तेह वेळीं माणुसें चित्रींचीं जैसीं : तेविं ठकलीं ठेलीं ॥ ६१० ॥

नवरत्नां ची चौबारी : उजुवीं घालीतु आला हाटां माझारी ॥
मग पातीनिला मुरारी : राज-मंदिरां ॥ ६११ ॥

तै कुंतिअे सी भेटी जाली : तंवं पाऊन दुपहारीं भरली ॥
मग बनीचा राउळीं : मेल्यकारूं केला ॥ ६१२ ॥

वारेयां ची झुळकी आली : तेयां परिमळा ची वानी धवधविली ॥
तंवं देवें दृष्टी घातिली : उद्याना कडें ॥ ६१३ ॥

तें कांईं वाणौ उद्यानवनु : जेथिचें ताटकाढे होअे मधु-वनु ॥
असिके नंदनवनु : ओवाळौनि : सांडिजे ॥ ६१४ ॥

कैलास-वन कडुवट : उमा-वन तुरट ॥
लक्ष्मी वन चविनट : तें पाहौनी ॥ ६१५ ॥

तें वसंता चे मूळ-पीठ : कीं परिमळा ची उत्तरवेंठ ॥
ना तें ओळलें आबुट : मकरंदा चें ॥ ६१६ ॥

मदना चे कीर्तीस्थंभ पाह्येले : की श्रृंघारा चे गेघु ओळले ॥
तैसें रुख-राए पाझिरेले : अंतराळीं ॥ ६१७ ॥

वरीचीली डाहांळियां उच्चपणें कांईं : वाणावियां ॥
जियां टाकिती हातापिटिया : नंदनवना तें ॥ ६१८ ॥

खांदियां चे निढाळपणें : दिशां देती परिमळा चीं बाणें ॥
तेयां रुखां चे उमानें : कवन घे ॥ ६१९ ॥

तिअें वनीं सूर्य्यकरूं न शिरती : तर प्रियां ची गुप्त-लिंगें केंवी दीसती ॥
परि गौर-मुखें चंद्र बखलिती : अंधकारा तें ॥ ६२० ॥

तेथ वसंतां करितां चढावनी : ग्रिष्मिअें केली रीगवणी ॥
तेयां तें वाणितां जानीं : अवधानु देइजे ॥ ६२१ ॥

वसंतां वाउगें बीकु : तें सुख चौ-गुणां अधिकु ॥
भणऔनि ते पाटा चे अंकु : मन्मथा चें ॥ ६२२ ॥

तो अष्टभोगां चा कुढावा : की ऋतुराया चा वाधावा ॥
ना तरी संभोगसुखां सी विसांवा : जोडला तो ॥ ६२३ ॥

कीं कामियां सी माजवन : श्रृंगारा चे वशी-करण ॥
कीं प्रमोदा सी औल्हावन : मन्मथा चें ॥ ६२४ ॥

अनंगा चा पूर्व डंकु : उभारितां नाहीं आणिकु ॥
तो ग्रिष्मी एकु : वांचौनियां ॥ ६२५ ॥

असो हें तेयां ऋतु चेनि योगें : कामिनियां आगळीं सौभाग्यें ॥
कनक-सोलिवें जालीं आंगें : तारूनियां ची ॥ ६२६ ॥

चंदनां दैव उदेलें : छाया-तरू पडपु जोडिलें ॥
पाणियां बीक चढलें : गोडिअे चें ॥ ६२७ ॥

मकरंदां दशा उदेली : चांदिनेयांसी तराअे जाली ॥
पाणियां छाया दुनावली : परिमळा चि ॥ ६२८ ॥

तै कापुरें चांगु मालाथिलें : कस्तुरियां थोरु भातविलें ॥
काम-तत्त्व राणिवे बैसले : संभोगसुखाचिअें ॥ ६२९ ॥

कैसा ऋतु मातविता : नलनी चे आलिंगनु न सोडी सविता ॥
भणऔनि मज पांता : दीसु वडील होतीं ॥ ६३० ॥

कनक-कमलें कल्हारें पार्यातकें सेंदुआरें ॥
गुंफीवु कीजेती औवरें : अशोका तळवंटी ॥ ६३१ ॥

वेलिअें वाटोगंरी : गुंफीजेती सिरोविरीं ॥
तेथ चांपेकळिकांची कुसरी : कांई सांघौ ॥ ६३२ ॥

सुधाकरा चा खांदवखालीं : धूइजेती कापुरा चीं सुआंळी ॥
वरी पार्जातकां चां फुलीं : सुवासु देइजे ॥ ६३३ ॥

ऐसीं धाराग्रहें सिंचणांरि : वाणितां स्थलु जाईल विस्तारीं ॥
तरि बोलतां आखरीं : रसु न दिसे ॥ ६३४ ॥

मोटका चंद्रु मुद्दैरेजे : सवे चीं साबरे आंतु रीगिजे ॥
मग संभोगसुख अनुभविजे : कुसुम-सेजे वरी ॥ ६३५ ॥

मळ्यानींळा चीं वाळानी : न भणतां माणिनीयांतें आणी ॥
तै तुडताळां चिआं जीणी : तियां पारुखैलियां ॥ ६३६ ॥

आंगिचेनि सकुमार-पणें : घनें होतीं भूषणें ॥
तै लेइजे परिमळां चे लेणें : वाळीपु वेढिजे ॥ ६३७ ॥

तेथ रचौनी फुलां चे अ्‍वरें : कीजेती चंदनपालवां चे वारें ॥
घालिजेति तुषारगारें : कर्पूरकर्दळी चे ॥ ६३८ ॥

स्त्रियां चे बोलनें : होडा कोंकिळां तें जीणे ॥
भणऊनि मीं भणे : तियां बोलो भिती ॥ ६३९ ॥

चांपेयां चियां लतां : मोतियां चा मुड्डरु दीसता ॥
श्वेदकाणियां चा पाडू उपमीजता : गोरेयां आंगावरी ॥ ६४० ॥

कुच-डोंगरां चा तळवटीं : लेऊनी अनुरागाचीं दुटीं ॥
हीम-कणुग्पा पाठीं : लागतु दीसती ॥ ६४१ ॥

ऐसा ऋतु चा मेळा : दखौनि यादव-राऊ मानवला ॥
मग वना माजी रिगाला : प्रेम पात्रां शीं ॥ ६४२

सिंचणारें वामें घातिलें : धाराग्रहो परतौनि पाहिलें ॥
तंवं पुढां सरोवरू देखिलें : चांपेया जवळीं ॥ ६४३ ॥

नंदनवनीचें खडुळ : मानसरोवरींचे महूंचळ ॥
मंदाकिनी चें पाणी चविढळ : तें पहौनी ॥ ६४४ ॥

तें कमळ कळियां चें सेजारू : कीं मकरंदा चें माहिएरू ॥
ना तें वसुवारू : अनंग-राया चें ॥ ६४५ ॥

नवरत्नां ची बांधनी : वरी विश्वकर्मा विंदानी ॥
तेथ रवणियां ची सोवानी : कांईं सांधों ॥ ६४६ ॥

मोंडिया वरी चक्रवाकें बैसती : तेथ दुजी प्रतिबिंबें उमटेती ॥
तिऐ प्रिये भणौनि चांचु-आंडे खोविती : चुंबना लागी ॥ ६४७ ॥

सिद्धरसा चें सत्व काढिलें : कीं पौर्णिमे चें चंद्रबिंबु पीळिलें ॥
ना तें क्षीर-सागरा चें भाण्डारु हिरतिले : उदका चेनि मिखें ॥ ६४८ ॥

पद्म-नळां चे गोफ लांबिले : ढळतेआं तरंगा चे हिंदोळे ॥
तेथ कंदर्पूकेळी खेळतीं युगळें : राजहंसां चीं ॥ ६४९ ॥

कनक-कमळां चां साबरां : घेतु मळयानीळा चा वारा ॥
मधुकर ग्रिष्मा चा उबारां : हातें लोटिती ॥ ६५० ॥

तेथ नागार्जुना चा गोसावी : जलकेळी खेळैल सुहावी ॥
नें कळाविदीं आइकावां : अवधान देऊनी ॥ ६५१ ॥

सरावरां निहटीं : घातली सोनकेतकी ची ताटी ॥
वरी मांडवी उभिली गोमटीं : पाचवर्णेयां परागा ची ॥ ६५२ ॥

धाकुटियां चांहाडी : वालिपे चिआं ऊली देतीं ॥
विलासिनीं वेढितीं : सोंडियां वरी ॥ ६५३ ॥

देव्हढियां वेणियां खोविलियां : रुळतियां नीरियां आखुडिलियां ॥
पोफळगांठीं सेले नेसलियां : सुंदरी तिआं ॥ ६५४ ॥

चोळियां चेआं पाखेयां : गांठीं देऊं लागलिया ॥
तंवं कुच-तटा चिआं थोरियां : देऊं न पुरती ॥ ६५५ ॥

तेंव्हेळीं काकणां चां हातीं : मौक्तिकां ची बिरडी सुढिलवती ॥
पयोधरां चें मूळपीठ दाविती : चोळियां फेडितां ॥ ६५६ ॥

जैसिआं चंदना चिआं खोळिया : मदन-यक्षिणी सांडिलिया ॥
कीं गवसनियां फेडिलियां : चांपेकाळिकां चिया ॥ ६५७ ॥

तिअें स्थनमंडळें निऱ्हां थोरटीं : भणऊनि सुनीं ठेविलीं साटीं ॥
तेव्हेंळी हारां ची पुरवणी सेवटी : करितांती ॥ ६५८ ॥

तेयां चें लावण्य कांई वाणावें : जेयां चेनि एकैके अवयवें ॥
आपण पर-ब्रह्म झांकवे : देखत खेऊ ॥ ६५९ ॥

तेथ देऊ संसारला : देव्हढा वेणी-बंधु खोविला ॥
रुळतां वालिपे चा सरंगु दाटिला : मालगंठी वरी ॥ ६६० ॥

वाटागरेयां चे हारु आखुडिलें : कूंदौलीं चें दु-सरें सरिसें केलें ॥
हातसरें बळियाविलें : एरवतियां चें ॥ ६६१ ॥

कानिर्चीं तोंगलें : संरिसीं केली करतळें ॥
बेग दाटिलें भलें : जातिकळियां चां ॥ ६६२ ॥

कनक-कमळां ची चिपुळी : वेऊनी करतळीं ॥
सिंचता जाला वन-माळी : प्रेम-पात्रां तें ॥ ६६३ ॥

तिअें मदना चीं मारांकें : सिंपावेआं निऱ्हां सुतवंकें ॥
फुन लाजे चिअें जवणिकें आड गुंडाळतांतीं ॥ ६६४ ॥

मग उधावत दर्डी : साजौनि कापूरकेळीं ची चिरकांडी ॥
उठाविलियां चहूं कडी : एकें वेळें ॥ ६६५ ॥

देऊ दुरौनि चिपुळियां सिंचती : तें तुषारु आंगी लागेती ॥
तंवं तंवं गुतकुलियां होतीं : फुन खसु न धरैं ॥ ६६६ ॥

डोळां चैतन्यें चोरिलीं : कामबाणीं आंगें विकळें गेलीं ॥
आतां तंवकां ची जलकेळीं : कवनु खेळें ॥ ६६७ ॥

तऱ्हीं तारुण्या चिआं टकमका : पाडु नाहीं तेयां नायकां ॥
फुन बहुतां चळोबाळिकां : पुढें रीगतांती ॥ ६६८ ॥

वेऊनी कनका चे घोटें : सिंपतांती एकें जवटें ॥
कटाक्षीं मन घाएवटें : फुन ठाऊ सांडिती ना ॥ ६६९ ॥

तेव्हेळीं देॐ आवेषलें : चिरकांडे परौतें सारिलें ॥
धोटा घेतलां करतळें चिंतामनी चा ॥ ६७० ॥
तो सथांउ धोटा : न साहे आंगां सानुटा ॥
तिआं अबलां निन्हां सोपुटा : भणॐनियां ॥ ६७१ ॥
तव विद्गद मालतियां बोलिजे : हा हो जी राहिजे ॥
देवे एव्हढा आवेशु कीजे : कवणां वरी ॥ ६७२ ॥
आपुलेआं पाडांचें पातिजे : तेनें सीं एसनें कीजे ॥
स्त्रियां वरी तारांनु मिरविजे : हें कोण राणेपण ॥ ६७३ ॥
हें कांईं वो माये : कैसें वाया चि वाअे ॥
मानुष सेवटा अे : झडकरौनी ॥ ६७४ ॥
अवो दुजी कनुधार लागती : तरि पाणिअें वाति पाजळती ॥
जळकेळी होती : निकीं कीरूं ॥ ६७५ ॥
धादुडा दुधडा गौळनी : जिअें मानुषें होतीं सिहानीं ॥
तया चिआं सिंपनेयां ची खावंनी : आह्मीं केवीं जाणों ॥ ६७६ ॥
बहुत श्रृंगारी परिसिलें : फुन एसनीं जलकेळीं कव्हनी न खेळे ॥
तंवं देवें भणातिलें : तें कैसें सांगा ॥ ६७७ ॥
होतीं शिहानीं चतुरें : तयां चे मन भीतरीं वावरे ॥
फुन ऐसी ढसाळें उत्तरें : कव्हणीं न बोलें ॥ ६७८ ॥
तुह्मीं अखळिचिआं राज-कुमरी : जाणतुसों तुमची थोरीं ॥
देखिलियांसी भूमासुरां चा घरीं : भोग भोगितां ॥ ६७९ ॥
शांखळां खांडौनियां : एकें वेळें केलियांति राणियां ॥
भणॐनि हें आह्मां पासौनियां : चतुरां जालियां ॥ ६८० ॥
ऐसीं देतां उलठणी : अनुरागरोपा ची लावणी ॥
अनंगु धवधनीं : सिंपनें खेळतुसें ॥ ६८१ ॥

कामां चिआ किशोरी पुआळिती : तैसियां उचलतां पायीं धावती ॥
यंत्रा आड आंगें लपविती : फुन अवयेवु लोपती नां ॥ ६८२ ॥
जो अप्राप्यु योगियां : तया तें धरूं पांति कामिनियां ॥
बापु जीवीची हांवं प्राणियां : कवणु न करी ॥ ६८३ ॥
असलगु ऐसां आवडे : सिऊ सिऊ न ए कव्हणीं कडें ॥
जेआं चे रूपु श्रृतीं नातुडें तै यां चा पाडू कांइसां ॥ ६८४ ॥
पाउलां दौ चौ सीनलिया : तंवं भणातिलें मदनकामिनियां ॥
तुह्मीं कैसियां वो शिहाणियां : वायां वीणु धावतुसां ॥ ६८५ ॥
पैल भावरमणी : आपनेयां तें भणवी शिहाणी ॥
फुन या चेआं सिंचनेयां ची रवावनी : कव्हणी नेणें ॥ ६८६ ॥
चांदिनेयां चेनि अनुवाअे : हे मधुमालती कोमाअे ॥
की हे हीं हातलेंबी विळतीं आहे : मन्मथें सीं ॥ ६८७ ॥
फुलां चेंनि भारें : ए मृणाळे चे आंगु कन्हारें ॥
कीं कैसी तिखटे धारे : वरी घालीतुसें ॥ ६८८ ॥
भवूरां चेनि पांखवातें : हे कदंबिनी चाचरी जातें ॥
हा ही हातपिटी खेळती आते : जगजेठीं सीं ॥ ६८९ ॥
आपुलेनि सकुमारपणें : हे न ले परागा चें लेणें ॥
ते परिमळ पालवी साहे कुचंबनें : श्रीचक्रधरा चें ॥ ६९० ॥
कोंकिळां चां स्वरीं : हे चवुके मधुर-स्वरी ॥
ते हीं घवघविता नूपुरीं : कैसीं धावतीसें ॥ ६९१ ॥
अवो अवो कृशोदरिअे : अडखळसी रत्नांचिअें पायरिअे ॥
माज मोडैलु गोखिअें : तरि कांईं करासी ॥ ६९२ ॥
मृणाळसुतां चे ऊर्लिसेलें : तुआं खांचटें भणौनि वेढूं सांडिलें ॥
तिअें चंद्रकळे सी कांईं जाले : कैसी घोटें साहतींसें ॥ ६९३ ॥

हा गे नाद वीणे : तुज न साहे उच्च गाणें ॥
आतां मातलीसी पंचबाणें : धुमाडु करीतीसी ॥ ६९४ ॥
कैसिया वो तुम्हीं शिहाणियां : कां धांवतुसां वाउगियां ॥
आतां यां चें सिंपनेयां ची खावणियां : माते पुसा पां ॥ ६९५ ॥
आतां मीं भणैनु तें करा : वाउगा ची अभिमानु न धरा ॥
औचिता करौनि धरा : मग लेखा येईल ॥ ६९६ ॥
रंगावतिअे तूं घेंई आधाटी : गाई स्वरां चा पढिमठीं ॥
रति-दूतिके तूं सांगै गोष्टी : कामशास्त्रा चिआं ॥ ६९७ ॥
रंगबाहाळा रूपका : वरि नाचो हे नृत्य-नायका ॥
मागां नाट्यचंद्रिका : ताळु धरी ॥ ६९८ ॥
तंवं देवें भणतिलें : हें तुम्हां काई पिसें लागलें ॥
माझें वैराग्य तिहीं-लोकीं नांदलें : ते कांई तुम्हीं नेणां ॥ ६९९ ॥
आम्हीं कां नेणिजे : आधीं गौळनी भोगिजे ॥
पाठी वृतबंध कीजे : हे कीं वैराग्य देवा चें ॥ ७०० ॥
बापु चांगु विरक्ती : साबडियां दीक्षितकन्यां हीं नुरती ॥
एरिं भणें उगि वो देवां येईल रंवती : मग बुझावती नां ॥ ७०१ ॥
चांग चि देवां विरक्ती उपनली : भणौनि सोळां सहस्रें अंतःपुरें प्रणिली ॥
एऱ्हवीं एक हीं नुरती भू-तळीं : कवतिका लागी ॥ ७०२ ॥
ऐसिआं सु-वर्म्मी बोलां चेनि लांचें : एकिं आंग टोकिलें देवांचें ॥
तेथ भारू जालें हांसे यांचें : देऊ धरिलें भणौनियां ॥ ७०३ ॥
तेव्हळी भणतिले शब्दसुंदरा : सिंचा वो सिंपा कनकधारा ॥
आधीं डोळां निर्बूज करा : मग लेखा येईल ॥ ७०४ ॥
धरि वो धरी आंचळीं : हीरी वो हिरीं हातींची चिपुळीं ॥
सिंची वो सिंपी वहिली : मेघमाळें तूं ॥ ७०५ ॥

तेनें रसें ताडली : देहुडेंनि आंगें मुरडैली ॥
असासितु झोंबिनिली : प्राणवल्लभा सी ॥ ७०६ ॥
गोरेयां आंगा चेनि ढाळें : सांवळें तेज भासळलें ॥
तेथ कैवल्य साळांक जालें नावेक वेऱ्हीं ॥ ७०७ ॥
आंगें सीं आंग निहटे : तेथ जलकेळीं चें कांहीं चीं न वटे ॥
मन लागट चोरटें : भीतरीं वांवरें ॥ ७०८ ॥
कैसा स्पर्शू माजिरा : कांईं सांघो तेयां पयोधरां ॥
हातौनि गळती कनकधारा : आंगें सांवरिती नां ॥ ७०९ ॥
मुरडिवें आंगें झाडी करितु : अनियाळां डोळां वेंझ घेतु ॥
कैसा केशतारणा अनंतु : सिंपने खेळतुसे ॥ ७१० ॥
झोंबतां पालौ फिटे : तेथ कुचतटी देवां चीं दृष्टी काजवटे ॥
तंवं तो धारासिंपे तिरवटें : डोळेंआं उजूं ॥ ७११ ॥
तिअें धारे चेनि दडवादडें : नावेकु मुख-चंद्र कानवडें ॥
फुन धुधुळियां कटाक्षु न कढें : कऱ्हणीं परीं ॥ ७१२ ॥
लागेति शताउ धोटें आंगीं उमटेति काम-पुटें ॥
तऱ्हीं खेळा चेनि कसमुसाटें : कांहीं जाणिजे ना ॥ ७१३ ॥
पाणियां चे गळाळें आलें : तें मळयानीळें हालें ॥
तै तुरवारू उसळैलें : माथेआं वरी ॥ ७१४ ॥
मोतियां चा सायारू बांधिला : कीं देवीं पुष्पवर्षाॐ केला ॥
ना तरी तारा-गणु ॐळगे आला : तेयां मुखचंद्रा चिअें ॥ ७१५ ॥
देव्हूडियां वेणिआं उकलैलियां : उधवटां गांठीं सूटलियां ॥
तिधारां अंदु फीटलियां : चरणीं चिआं ॥ ७१६ ॥
कंदुलां चे हार तूंटलें : अशोकां चे झळबुकें गळलें ॥
ताबुळां चे उगाळु पडिलें : मलपा वरी ॥ ७१७ ॥

अनंगा चिआं कुळदेवतां : श्रृंगारे वर्त्तु वाइला मज पांता ॥
तेथ वालिपें सिंचितां : आंगे सीं विरौनि गेलीं ॥ ७१८ ॥

लाजे चिअे बुंधी भीतरी : गुप्तावेऊ लपवितीं तियां सुन्दरी ॥
हा भाऊ वाणितां जासी अतिच्यारी : तरी रसिकु कोपतीं ॥ ७१९ ॥

पूर्णचंद्राडौनि आभाळु काढिलें : की श्रृंगारें पाहाळ उपटिलें ॥
तैसें अवयेवु उमटलें : वालिपें आडौनी ॥ ७२० ॥

नितंबु आलिंगनीं सुखाविलें : बांधितां आंसुवें गाळौ लागलें ॥
तेविं केळकळांपु मिर्वलें : उदकाबिंदु स्तव ॥ ७२१ ॥

ऐसीं जलकेळीं सरली : तंवं सवाअे दुपहारि जाली ॥
मग देवांगें वेढिलीं : देऊ भीतरां आले ॥ ७२२ ॥

तेथ राऊ युधिष्टिरू : देवां करितां जाला पाहूनरू ॥
तेसांगतां कथें विस्तारू : अतिं होईल ॥ ७२३ ॥

आरोगणां केलीं सपरिवारीं : नावेकु पहोडेलें सेजारी ॥
मग बीजे केलें मुरारी : सभामंडपा सी ॥ ७२४ ॥

तेथ धर्मे वीण्विजे : देवें एथ केलें ब्रिजे ॥
तरि अवधानु देइजे : या काजां शीं ॥ ७२५ ॥

न पांता आपुलें बळ : मियां मालकै केली नवल ॥
जें आदरिलें अढाल : राजश्रिये चें ॥ ७२६ ॥

फुन भूतळी चेआं रायां अठवरां : माझेयां खांडया चा करौनि नोवरा ॥
तुआं लग्न लावावें श्रीचक्रधरा : उभेआं ठाकौनी ॥ ७२७ ॥

आजी तुझीआ बळोवळी : अरिराअें जिणावें समदळीं ॥
फुन नांगवसी भूतळीं तूं चि एकू ॥ ७२८ ॥

तंवं वदिलें दैत्य-विभांडें : तुआं भक्ति-भावा चेनि कैवाडें ॥
आमुतें जिंतिले फुडे : नेणों केवीं ॥ ७२९ ॥

तेव्हळीं सर्वज्ञराअें श्रीचक्र-पाणी : धर्मु लागौनि श्रीचरणीं ॥
करितां जाला वेव्हानी : चातुरंगांची ॥ ७३० ॥

जो पांडवां पागारू : वैरिआं बडिवारू ॥
तो पूर्व-दिशे वृकोदरू : धाडिला जैतासिंहे सीं ॥ ७३१ ॥

पंचाळदेशीचा राउ : वीरध्वजु सवें जाउ ॥
रणदीवा सहदेउ : दक्षिणदिशें ॥ ७३२ ॥

राअे रणबंबाळु : पश्चिमें जाउ नकुळु ॥
सरिसा जाउ कां महिपाळु : मध्यदेशीचा ॥ ७३३ ॥

पडिलेयां सरिसी : जो महाकाळें सीं कासीं ॥
तो अर्जुन उत्तर दिशे सी : धाडिला द्रुपदें सीं ॥ ७३४ ॥

देवां चेनि तेजें बहुवशें : अरिराअें जिंतिलें अनायासें ॥
पुन अर्जुन उत्तर दिशें : चांगावें नव्हें ची ॥ ७३५ ॥

तेव्हळी धर्म्मु च्निंतावेला : दीर्घ स्वासु घातिला ॥
शिना चा बोलु बोलिला : देवां पुढें ॥ ७३६ ॥

बापुरें प्राचिन्ना : कैसीं विधी ची घटना ॥
बाहार पुरविली अर्जुना : बहुतां दिसां ॥ ७३७ ॥

कांई रुसों देवां : गुढिया उभिलियां कैरवां ॥
वैरि आं ग्रहीं वाधावां : आजि जाला ॥ ७३८ ॥

कणैरी ची लारवौली वाउनी : प्रतापा ची दीपवती उजळौनी ॥
कृतांतपा तपोवनी : जेणें त्रिनेत्र तोखविला ॥ ७३९ ॥

तयां ते जिणै जरासुतु : वरी तूं अससीं पांतु ॥
हा ठाउ वेव्हीं विपरितु : आह्मां धात्रा जोडला ॥ ७४० ॥

तंवं भणे यादवराउ : एठ हा चि उपाउ ॥
जें बोलिला उद्धवदेउ नीगतां अवसरीं ॥ ७४१ ॥

तेव्हेळीं ब्राह्मणा चीं रूपें धरूनु : निगाला देऊ भीमार्जुनु ॥
बापु बळिआ अभिमानु : कांई एकु न करवी ॥ ७४२ ॥
निगालेआं चैतन्यनाथां : अंतौरां उपणलीं अवस्था ॥
तें आइकतु रसिकु आतां : भणे कवी भास्करू ॥ ७४३ ॥ * ॥
फुन तें अवस्छा वाणितां : अत्योक्ती न भणावी जाणतां ॥
तेयां विश्वात्मयां चा विरहो भोगितां : कांई एक नव्हें ॥ ७४४ ॥
जेहीं आपुला संभोगकाळीं : परब्रह्म भोगिलें आहाळबाहाळीं ॥
तयां चा विरहो बोलीं : सांगवे ना ॥ ७४५ ॥
विरहानळा चिआं ज्वाला : लागेति सूर्यमण्डला ॥
भणऊनि संतापु आगळा : तेथ चि दिसे ॥ ७४६ ॥
सरळें मुखानळें : आकाशु आहाळैले ॥
ते अद्यापि काजळैले : दिसतुसें ॥ ७४७ ॥
डोंगरें धडाडिती : तेथ अरूप पारखी रडती ॥
आठै अंगे पोळती : वसूंधरे चीं ॥ ७४८ ॥
कांई सांगौ या परौती : उदकें उसळवाटीं कढती ॥
असो हें विकळें आंगें पलिती : सेजे वरी ॥ ७४९ ॥
कीं पूर्वाचळा : वरि हुरळैलियां चंद्रकळां ॥
तैसियां तिआं बाळां : दीसतांतीं ॥ ७५० ॥
कीं मळयागिरीचां माथां : वनवलिया चंदनलता ॥
कीं वेह्माळां विद्युल्लता : सेजें आलियां ॥ ७५१ ॥
ते देखौनि विकळपण : बोलती सरवजिन ॥
आतां त्रिपाअें वांचिती प्राण : विरहिणीं चें ॥ ७५२ ॥
सोळां सहस्र अंतःपुर : तेतुलेयां नानां उपचार ॥
ते सांगतां स्थळ होईल अपार : तरि रसु आवरे ना ॥ ७५३ ॥

होतिं अधवियां ची विरहिणी : फुण निऱ्हां अवस्था रुक्मिणी ॥
तिऐं सी सखींजन धावनी करितांती ॥ ७५४ ॥

अमृता चेआं सरोवरीं : आणिलीं ती विद्या-धरी ॥
सुंदरी कर्पूर-गौरी : उदका माजी ॥ ७५५ ॥

तंवं वदे भीमकुकमरी : हे कह्वणीं वो विरहोपचारू परी ॥
जें आगिऐला चां सरोवरीं : घालिजे पुढिला तें ॥ ७५६ ॥

अह्वेरिलेआं यदु-पाळे : माझेनि नावें पाणिजळें ॥ मरण
आंगीं लागतांतीं कमळें : इंगळें जेसीं ॥ ७५७ ॥

ऐसें बोलु दोनि बोलिली : तंवं वारेयां ची झुळकु आली ॥
मग निचेष्टीतु पडली : वैदर्भी ते ॥ ७५८ ॥

उह्लासचंद्रिका सावध केली : मृणाळिका उसंगिऐं घेतिली ॥
मग धाराग्रहां आणिली : वैदर्भी ते ॥ ७५९ ॥

तें धाराग्रहो वाणितां नवल : तरि विरहोपचारू ठाकैल ॥
तऱ्हीं आइकतु रसाळ : उभणी ते ॥ ७६० ॥

कस्तुरी चा पुह्लो चिवडौनी : कमळां चें ती-थरें रचौनी ॥
कुमुदां चें परागु कालौनी : गोंटी पीटिली ॥ ७६१ ॥

अशोकां चिआं भींती : कर्णीकरांची चित्रें उमटेंती ॥
जाती गवाक्षें बाहकाती : मदनमोगरेयांचीं ॥ ७६२ ॥

चंद्रबिंबा चेनि पाडे : पांतां दीसतुसें चोखडें ॥
अरुवारु घाडिलें दळवाडें : कापूरकेळी चें ॥ ७६३ ॥

गोरियां सोनेकेळीं : कामौनि कीजेति खांब-उथाळीं ॥
कळिकांपात्रें ऊडवीलि भली : जातिकाळिकां ची ॥ ७६४ ॥

हरिचंदना चे फोक : सोलौनि कीजेति दारवंड त्रिशाक ॥
वरी सेंदुरें विनायक : नवसिआं चे ॥ ७६५ ॥

बुचकुंदां चिआं पाटियां : कह्लारां चिआं मोहटियां ॥
प्रागवेली गोमटिया : च्यूतांकुरां चिआं ॥ ७६६ ॥
चांपैला चिआं पुतळियां : हातीं कनका चिआं चिपुळिया ॥
तेथौनि धारां सूटलिया : दीसती ना ॥ ७६७ ॥
केशां चिआं चिरटिया : पांतां दीसती थेराटिया ॥
फुन तिआ धारा सानाटिया : बहुतें पाडें ॥ ७६८ ॥
धारें सीं धार निहटें : तेथ गोरा तुषारु फुटे ॥
परिमळ गगणा चिअें बेगवटे : माजि माअे ना पोट ॥ ७६९ ॥
बापु सूत्रधारू : कैसा पाणियां चा धरू ॥
कवणी कडे संचारू : तो चोजवे ना ॥ ७७० ॥
कैसा नवलविंदानी : पुताळियां चाह्लेंति वळनवाहानी ॥
रंगा ची विखुरणी : मोगरीं अशोकें जांली ॥ ७७१ ॥
ऐसिअे धाराग्रहीं : वैदर्भिअें सुख नाहीं ॥
मग आणिकु उपचारु केला तेहीं : तो सांगिजैलु आतां ॥ ७७२ ॥
केतुकीदळां चीं सेजारें : पाची चीं साबरीं परिकरें ॥
गुंफीव कीजेंति ॐ वरें : अशोका तळवटीं ॥ ७७३ ॥
कर्पूर—कर्दळी चे हिंदोळें : मृणाळसुता चेनि पाटें विणिलें ॥
चंदनपाह्लव कोंवळे : घासिलें सेजे वरी ॥ ७७४ ॥
कापूरकुमुदां चें पाणी : मर्दिजे चंद्रकिरणी ॥
तेणें ते विरहिणी : झळंबीजे ॥ ७७५ ॥
अदमुरें चांदिणें फोडिजे : कैरवां चा मकरंदु काढिजे ॥
तेयां दोंहीं चा काला कीजे : सरिसेनि पाडें ॥ ७७६ ॥
आधी मळयानीळें निवडिजे : मग चंदनरसें ॲह्लाविजे ॥
पाठीं बोलता वासु दिजे : पार्जातकां चा ॥ ७७७ ॥

पाहातिअे निशी : तो रसु भरिजे हेम—कळसीं ॥
मग कुमुदकां चा रसीं : झांकने दिजे ॥ ७७८ ॥
तेयां पाणिआं चा ढाळु : करितां उपजे बाळु ॥
अधिका विरहोनळु : उधावतु दिसे ॥ ७७९ ॥
कर्पूरकर्दळीं ची गाभेवनें : भिजवीजतीं ॐलेनि चंदनें ॥
तेहीं तिअें मयंक वदनें वारा घाणे ॥ ७८० ॥
कनक-कमळां चां कुचोळा कीजे परागा चा उधळा ॥
तो सर्वांगी बाळा : जिरवितांती ॥ ७८१ ॥
सोनकेतकी ची दती काढौनि कीजे कनकनीती ॥
तिअें सारिसां भांजिती : मळयानीळु ॥ ७८२ ॥
पाहातेआ पांहारां तें उदकुं भरिजे कनकधारा ॥
तेयां लागौं देइजें वारा : चंदनतरू चा ॥ ७८३ ॥
ते उदकधारा गोमटी : थोरू ना सानटीं ॥
कदंबिनी घालिंती मुकुटीं हळु हळुं ॥ ७८४ ॥
धूइजे कर्पुरोदका चां सरोवरीं : खलवीजे मोक्तिकां ची चुरीं ॥
ते वाळीपु उबारा करी : चंद्रकीरणींचा ॥ ७८५ ॥
नपाहातां सवेळें : मानसरोवरींचीं कमळें ॥
आणिजेती करंबाळें : गुंडाळौनियां ॥ ७८६ ॥
तेयां चां मकरंदु जळीं : कीजे पानतुळीं ॥
चहूं कडे चांपेंकळीं : गोट बांधिजे ॥ ७८७ ॥
तें पाणी आणौनि परिमळा भरीजेतिं सागळां ॥
मग पद्मिनी चा पाणिपत्राळां : वीजितीं हळु हळुं ॥ ७८८ ॥
वैदर्भिअे चेनि मुख-कमळें;कांति चंद्र—बिंबु विभांडिलें ॥
तें ऊदकूं होतें ठेविलें : हेमकळशीं ॥ ७८९ ॥

तें थोरीं पाहृात-पटीं : भरिजे सूक्ती-संपुटीं ॥
मग हीवें पटिों देइजें वाळुवंटीं : मंदाकिनीं चां ॥ ७९० ॥

तेयां चा तुषारु घालिजे : तरि सर्वांगीं विकळतां उपजे ॥
ते अवस्था सायासें लोटिजे : फुन लोटे ना ॥ ७९१ ॥

कुमुदां चां पाणी : थारे चंद्रकरां चें पाणी ॥
तेयां कीजे भांजनी : मकरंदेंसीं ॥ ७९२ ॥

मग तेयां सी घालिजे : मकरंदा चें विरजे ॥
चौथाहारीं कीजे : खोटि जैसें ॥ ७९३ ॥

तें लाविजे कुच-तंटी : तरि सर्वांगीं सुटे चुटपुटी ॥
आंगु घालीं तळवंटी : वैदर्भी ते ॥ ७९४ ॥

तंवं भणे उपच्यारूमाळिका : हीमग्रहां नेयावी हे नाइका ॥
झणें मागौति पाल्लका : वरी घाली ॥ ७९५ ॥

तें हीमग्रहो सु-शतिळ : वाणितां स्थळ पसरैल ॥
तरि रसु वितळैल : अवस्थे चा ॥ ७९६ ॥

शियां चेनि भरें : हीमाचळा चे हीम मुरें ॥
तेआं चें सपिंड काढांवे चिरें : पुरुरवप्रमाणें ॥ ७९७ ॥

ते घडौनि अरुवारू : कनकनीतु उभिलें सेजारूं ॥
तेथ विरहोज्वरां उपच्यारू : मानिती ना ॥ ७९८ ॥

तंवं भणे रत्नावली : न करीं वो न करीं पानतुळी ॥
चंदनु नुगाळी : सुगंधिके तूं ॥ ७९९ ॥

हा तंवं नव्हे विरहज्वरू : इअें सीं जाला कांहीं संचारू ॥
एऱ्हवीं एकु हीं उपच्यारू : कां न मनीं ॥ ८०० ॥

ऐणें पूर्णचंद्रे विचित्रें : मज पांता घातैली कुजांत्रे ॥
जिअे कामा चेनि बीजमंत्रे : फीटेति ना ॥ ८०१ ॥

कस्तुरीमृगा चे दडे : हे जीणे परिमळा चिअे होडें ॥
तरि ते हान चेडे : करिती ना कीं ॥ ८०२ ॥
आपुला मधुरस्वरीं : हे सदां कोंकिळां तें विसारी ॥
तरि तेंही ए सुन्दरी मुख-स्थंभु केला ॥ ८०३ ॥
कीं चालितां गति-विलासीं : इआं वीप लाविली राजहंसी ॥
तरि तेहीं खिळनी केली इअे सीं : असाहाणुपणें ॥ ८०४ ॥
अशोकपल्लव जगीं वाखानलें : तेही इआं हात उभौनि जिंतिलें ॥
तेहीं कां कौटाल्य केलें : जें हातु हालौ न अे ॥ ८०५ ॥
कटाक्षा चा मोसु देखिला : तेणें नीलोत्पलां जाली अवकळा ॥
तेही सैंग उधळा सूदला : जें वासु पाहों न अे ॥ ८०६ ॥
आंगा चेनि गोरेपणें : हे पण्हुरेयां वरी पढवी आंकणें ॥
तरि आसूड केला तेणें : मज पांतां ॥ ८०७ ॥
कामां चा हिंदोळां एकली : ह मोकळां केशीं झोबिंनली ॥
तेव्हेळीं बाधा जाली : तिअे रण-देवते ची ॥ ८०८ ॥
ऐसा कव्हणीं देशी : नाहीं जाणा जोशी
जो इअे चिअे पीडे सी : रूप करी ॥ ८०९ ॥
गारुडी नाहीं ऐसा एकू : जो भारौं जाणे पूर्वडंकू ॥
तरि तो अवतरौनि तक्षकू : फुडें सांगतां ॥ ८१० ॥
तंवं वदें भूतमुद्रावली : इअें वैदर्भुमंडळीं ॥
जाणे मनकवळीं : संगितु हा ॥ ८११ ॥
तंवं भणे मंत्रमुद्रा : काढी परिमळा चा देह्वारा ॥
तो भले तेआं ग्रहगोचरा : निवाडू सांगतां ॥ ८१२ ॥
परिमळा चां राहाणी : अनंगा अवतरौनि आणी ॥
मग सांगे विरहिणी : उपचारु तो ॥ ८१३ ॥

कमळां चां सरोवरीं : असें मकरंदु चां पाखरी ॥
परागा चा भारदोंरी : बांधे विरहिणी शी ॥ ८१४ ॥

कैसियां साचा सकळां : नंदनवनीचिआं कोकिळां ॥
तिआं चिंतिलियां पोफळां : चांग जाणती ॥ ८१५ ॥

एकैके वेळें जालें दुखणें : तै आम्हीं केलें पुसवणें ॥
कीं भ्रमरु कोह्नी हीं खुणें : चुकती चि ना ॥ ८१६ ॥

इअे ते ऊ्वाळोनि आखतां : दावावियां वसंतां ॥
जो आइकीजे डाकुलौतां : इअें पासांती ॥ ८१७ ॥

पौर्णिमे चे चांदिने : आखतीं वीण ज़ाणे ॥
तेया तें पुसवणें : करौ जातां ॥ ८१८ ॥

तंवं भणे रुक्मिणी : ऐसिआं तुम्हीं साजनी ॥
तरि माझिया वैरिणी : तिआं कैसिआं ॥ ८१९ ॥

कैसें वो तुमचें करण : जे पुंढिलां एऊ पाहे मरण ॥
जें आपुलें ढिसाळपण : सांडां ना तुम्हीं ॥ ८२० ॥

हें काळे पाखिरू : मज सी सदा चिंती विरू ॥
कीं यां तें उपच्यारू : पुसों जातुसां ॥ ८२१ ॥

कां भीमका ची आण : हे चंद्रकिरण ॥
मज सूती आहान : अनेग वेळां ॥ ८२२ ॥

एणें मळ्यानाळें : मज श्रीखंडा चें विख सूदळें ॥
तें सर्वांगु जालें काळें नीळें : नखां सकट ॥ ८२३ ॥

चांपेआं चेनि परिमळें : मज मारें घातिलें ॥
ते मज पुढां मालतिआं सांघीतिलें : साबरेआ आंतु ॥ ८२४ ॥

च्यूतांकुरा चा थोरकांडीं : प्रमदां चे ह्रदय पाखाण फोडी ॥
तो विरहो वनीं अवघडी : वसंतु मारौ पांताअे ॥ ८२५ ॥

माझा काळां केशीं : सदां वैरूं भ्रमरां सीं ॥
कीं स्वभावें तेआं पाशी : जातुसां तुम्हीं ॥ ८२६ ॥

ऐसें बोलु दोंनि बोलिलीं : तंवं वारेआं ची झुळक आली ॥
तैसीं चि निचेष्ट पडली : वैदर्भी तें ॥ ८२७ ॥

तंवं वदें प्रबोधावती : सरां वो सरां परौतीं ॥
चैतन्य गेलें नेणो केउतीं : तें मज पाहों देआ पां ॥ ८२८ ॥

मेलिअे वो माअे : कैसी मान घालीतु आहे ॥
वहिली गे धाअे : बोलावी आरुतीं ॥ ८२९ ॥

आवो दुसरी झुळक येइल : तरि जीवनकळा अस्तवैल ॥
मग कैसी देखिजैल : वैदर्भी हें ॥ ८३० ॥

चांदिनेया चिआं दुपाहारीं : वायां निनिली बाहिरीं ॥
कैसी सर्वांगें सुन्दरी : खिरडली हें ॥ ८३१ ॥

न लवीं वो कर्पुरू : सार्वांगीं येतुसें उ्ऽदरूं ॥
अधिकां चि विरहोज्वरूं उधावतु दिसें ॥ ८३२ ॥

लेपु न करी वो कस्तूरिअें चा सवडा जातसें आंगिचा
स्पर्शु जालेआं कमळां चा : तनु करपतुसें ॥ ८३३ ॥

उ्ऽलियां मोतियां चें ऊटणें : लाविलेयां पोळली कोणें मानें ॥
न घालि वो वारे वीजनें : कमळदळां चें ॥ ८३४ ॥

ऐसीं कवण वो ढसाळ : जे घातिलें मकरंदजळ ॥
कैसें पांचवनें जाळ : मुखें नीगतांतीं ॥ ८३५ ॥

कोणी गे निःपरंवसा : उघाइली वसंता ची दिशा ॥
वारी वो पढतेयां पुंसां : कोप कलहंसां सीं ॥ ८३६ ॥

माधवीमंडपां आणिली : हें कुडी बुद्धी केली ॥
कैसीं दिहें दिहूं उ्ऽसावली : वैदर्भी हें ॥ ८३७ ॥

खुडी वो च्यूतांकुरू : हें खुपती सकडतरूं ॥
तोडि हें तोवरू : अशोकतरूं चें ॥ ८३८ ॥

उभावी वो मधुकरू : विसारीं वो चकोरू ॥
यां सीं पडिलेसें वैरू : अधवेयां सीं ॥ ८३९ ॥

तंवं भणे कुमदलळिता : इआं भूतां कवणु संहारूकारितां ॥
तरि तेया ते उपाउ पुसजितां : यां चां वधीं ॥ ८४० ॥

कवणें प्रकारें : हे चांदिणे निवारे ॥
तुटौनि पडतीं शिरें : एयां कुमोदां चीं ॥ ८४१ ॥

कवणें लोहें तिखटें : हा ऋतुराउ निवटें ॥
घाअे हाणौनि धड तुटे : यां परिमळा चें ॥ ८४२ ॥

ऐसां कव्हणी नाहीं अभिचारिकू : जो होमी कोंकिळां चां देशिकू ॥
चंद्रा चा काळडंकू : पूर्णाहुती घाली ॥ ८४३ ॥

कुजांतरूं नाहीं ऐसें : जेणे यां पुसेयां ची दांति-खिळी बैसे ॥
कुडकुडें होतीं आपैसे : मधुकरूं हें ॥ ८४४ ॥

तंव बोलिली प्रेमतरंगिणी : इअें कैसीं तुमचीं बोलनीं ॥
विरहाग्नी ची धावनी : कांई ऐसीं असे ॥ ८४५ ॥

इअें हाचि उपाउ : जे मिळे यादव-राउ ॥
येऱ्हवीं इअे चा विपाउ : मज पांतां ॥ ८४६ ॥

इअे चा किरूं प्राणेश्वरू : फुण ऐसां नाहीं योगेश्वरू ।
जो श्रीकृष्णा चा विरहोज्वरू : साहों शके ॥ ८४७ ॥

एणें नामांमृतें उल्हावली क्षिणैकु सावधु आली ॥
तंवं ढळमाळितें आंसुवें पडिलीं : वक्षस्थळां वरी ॥ ८४८ ॥

जैसें अनुष्टानिअें लोचनु : तें वांचावेआं स्त्रीरत्नु ॥
करितांति धारी तर्पणु : मदनलिंगां सी ॥ ८४९ ॥

अठवितां एकांतीची खुण : प्राणां होओे मेह्ळवण ॥
हा भाऊ सांगितां विरैती अंतःकरण : श्रोतेयां चीं ॥ ८५० ॥

वैदर्भी प्रियालापु आठवी : हा भाऊ न बोलों भास्करकवी ॥
जगा सी विरहोऽवस्छा होईल नवीं : तुझेनि रसाळुपणें ॥ ८५१ ॥

ऐसीं करितां धावणी : त्रीरात्रीं गेली तिअें विरहीणीं ॥
एरी कडे श्रीचक्रपाणीं : कांई करितें जालें ॥ ८५२ ॥

जरासंदतरू ची गर्व-फळें : झाडिली पैती यदुपाळें ॥
दुफोंडीं करविलीं करतळें : भीमसेना करवी ॥ ८५३ ॥

मग बीजे केलें बंदिशाळें : तेयां रायां चें बांद सोडवीलें ॥
तिअें राणिवे स्छापिलें : सहादेवा तें ॥ ८५४ ॥

तिअें राणिवे चा उगाणा : घेऊनि धुरां चां राणा ॥
आला पेणावेणा : इंद्रप्रस्छा सी ॥ ८५५ ॥

मिनलेयां वनमाळीं : वैदर्भी ची अवस्छा निवर्तैली ॥
ते सांधितां बोली : कथें विलयो पडैल ॥ ८५६ ॥

तेथ होतें अध्वरिअें उद्वातें : मेळऊनि यज्ञ—द्रव्यां तें ॥
याग करौं आदरिला तेथें : धर्मराअें ॥ ८५७ ॥

स्वर्गा करौनि उपेणें : मागिजे सुखाचें केणें ॥
तेआं धर्मा चें यज्ञकरणें : कैसें सांगों ॥ ८५८ ॥

तेथ आफाऊनि दैत्य—सूदनु : दीह्ला अग्रपूजे चा मानु ॥
तंवं तंवकैला नंदनु : दमघोषा चा ॥ ८५९ ॥

आवेशौनि चैद्यें भणितिलें : या या धर्मा कांई जालें ॥
सांडौनि द्विज कुळें : ययां पूजा कांइसी ॥ ८६० ॥

हा नोहें चि कुळिपु : ययां नाहीं माएबापु ॥
कांइ हा सुस्वरूपु : ऐसें कह्णी नेणें ॥ ८६१ ॥

ययां चा वर्णु : चोजवितां नेणवें कवणु ॥
कैं ऐसें पांतां ययां एकु हीं गुणु : आथी चि ना ॥ ८६२ ॥

आचारां सकळां : हा सहजे चि वेगळां ॥
वरि श्रुति-पंथु सांडिला : नेणों केवि ॥ ८६३ ॥

तंवं सात्यकी बोलिला : हां गा अे शिशुपाळा ॥
जेणें तुज पुरविला सोहळा : तो कांई विसरैलासी ॥ ८६४ ॥

तंवं चैद्यु भणे : हें कांइसें मातें भेडवणें ॥
ययां ची टवाळें जाणें : मीं अधवीं ची ॥ ८६५ ॥

ययां सटीरात्रीं पाहिली : सेजे गौळनी पडिताळौ आली ॥
तें अेणें घरांतु मारिली : पूतना भणौनि ॥ ८६६ ॥

जमुने चा पाणिअेडा : एनें थोरु केला पवाडा ॥
जें पांखिरू एकु चांचुवाडा : धरौनि उपटिलें ॥ ८६७ ॥

बापुडें किरुडु : कह्वणां हीं न चिंती वीरू ॥
तें वाटें मारिलें अघासुरू : भणौनियां ॥ ८६८ ॥

गोकुळींचा वसो एकु मारिला : तेआं नावारिष्टु ठेविला ॥
आ ठेगु एकु मारिला : केशिया भणौनी ॥ ८६९ ॥

आणीकु एकु भला : एणें पुरुषार्थु केला ॥
जे मामा मारिला : बटें धरौनी ॥ ८७० ॥

बाउलेयां चेआं सांगडे : घरीं कीजेंति पवाडे ॥
ते मज चैद्या पुढें : बोलों न एति ॥ ८७१ ॥

ऐसिआं देतां गाळीं : भूतधात्री कांपीनिलीं ॥
तंवं सैन्यें पालानिलीं : पांडवां चीं ॥ ८७२ ॥

तेह्वेंळी यदु-पाळें : पांडवां तें वारिलें
फुण ते असहानु जगदळे : धरिती चि ना ॥ ८७३ ॥

अवचितां विसरां : घोडेयां न घलीती ची पांखरा ॥
तंवं पुढिलां असुआरां : भिडौ सरलें ॥ ८७४ ॥

हो रे हो जालें : तंवं पारकें संसारलें ॥
सेग धावीनिलें : सिंहुनादु देतां ॥ ८७५ ॥

रणतुरां चेंनि बंबाळें : भीडींनिलीं दोंनि दळें ॥
तेथ बहुत माणुष रणां आलें : एरु एरां चें ॥ ८७६ ॥

पांडवी बाणीं जिंतिलें : तंवं एरूं मोडिलें ॥
भीमसेनें पांचारिलें फुन परततीं चि ना ॥ ८७७ ॥

तेआं भीड भीमसेना : जुंझतां बहुती आंगवणा ॥
परतिजे ऐसीं ह्रांव कह्रणां : उपजे चि ना ॥ ८७८ ॥

तेआं जुंझा ची कळाकळी : ते देशां चि वेगळीं ॥
महा-काळें शीं कवळी : देऊं पातांती ॥ ८७९ ॥

आमोलेयां चेआं दळभीडा : पुरतां हातियेरूं कैचा तेह्रडा ॥
भणऊनि पर्वता चां हात-गुंडां जुंझतु असे ॥ ८८० ॥

रथें रथूं दाटी : गजें गजां उपटी : ॥
घोडेआं रउता दे मिठी : एकें वेळें ॥ ८८१

अर्जुना चेनि कांडाळें : बहूंत माणुख रणां आलें ॥
मग महारथिअे परतेलें : जैतवना जवळिके ॥ ८८२ ॥

तिहीं शीं घेऊनि आदळु : न लगतां बहूत वेळु ॥
पिटैानी सूदला शिशुपाळु : पाळेयां आंतें ॥ ८८३ ॥

मग पांडवीं ऊहटु केला : दळभारूं मागौता परतैला ॥
एरी कडें कांई करितां जाला : चैद्यु तो ॥ ८८४ ॥

धाडौनियां शिशुपाळें : शैल्या तें आफाविलें ॥
मग वृतांतु सांगीतिलें : तै तेआं पुढें ॥ ८८५ ॥

तंवं शैल्यें भणतिलें : कांइसें पांडवु काढिलें ॥
पांचै एकें वेळें : बांधौनि आणैन ॥ ८८६ ॥

आतां कांइं बोलें वायां ची : तेह्वळी मीं तेथ नसें ची ॥
एऱ्हवीं निःपांडवी सृष्टी ची : करौनि फेडितां ॥ ८८७ ॥

तंवं वदीनिलें शिशुपाळें : आधी मीं हीं ऐसें चि बोलें ॥
फुण जुंझातिअे वेळें : तें विसरौनि गेलां ॥ ८८८ ॥

एरू भणे कांइं तूं जालासीं : मातें देखत खेऊं पळतीं कैसी ॥
आतां यादवां लावैन विवशीं : तरी शैल्यु होअें ॥ ८८९ ॥

एकाकी समदळीं : ऐसा कवणु असें बळी ॥
जो मज शीं जुंझे अे भू-तळीं : रायां माजी ॥ ८९० ॥

लांबलांबे कासोटें : मिरविती आबुलिआं पुढें ॥
तें यादव बापुडें : कांइं मारावें ॥ ८९१ ॥

जुंजारां नावें तोडरू : पाईं काढी हा चक्रधरू ॥
तो माझेआं घाआं समरू : कहीं नोहें ॥ ८९२ ॥

लोहांचा विसुरा : बलिभद्रु नह्वे शौरा ॥
तो माझेआं भुजां चा उबारा : कांइं साहिल ॥ ८९३ ॥

हा सदां पाणिबुडा : युधिष्टिरू : साबडा ॥
तो माझेआं कांडां : सदां भिअे ॥ ८९४ ॥

दळभिडे थोरू : जीवें लाठा होअें वृकोदरू ॥
तो उजु हातिअेरू : धरौ नेणें ॥ ८९५ ॥

सहजा विंधौन : आळमाळ होअे अर्जुन ॥
तो मज शीं राहौन : जुंझ नेघे ॥ ८९६ ॥

समोरिलां घांईं : मज शीं जुंझतील कांइं ॥
ययां सकराडिआं गाईं : नकुळसहदेवो ॥ ८९७ ॥

दिहा दिवीं : मीं तिहीं लोकीं लावीं ॥
मज सीं परजितां दावी : ऐसा कवणु असें ॥ ८९८ ॥

ऐसेंआं घरलाठेआ बोलां : तो चैद्यु मानवला ॥
मग सर्व दळवै केला : शैल्य तेणें ॥ ८९९ ॥

तंवं उदैलीं भयासुरें : अरिष्टें थोरु थोंर ॥
जेंहीं मुसीं जाति शौरे : देखतु खेऊ ॥ ९०० ॥

दिहां धवळे आं : मुंकेति भालुआं ॥
बैसेंति धुयां : मानुषां वरी ॥ ९०१ ॥

खांखांतें प्रेतें : खाअें गिळी करिते
दिसतिं धांवंतें : पाळेआं माजीं ॥ ९०२ ॥

बह्लाळताटियां चां द्वारीं : दक्षिण-दिशें कुमारीं ॥
तें नागोवी रोदन करी : मोकळां केशीं ॥ ९०३ ॥

रुधिराचा पाउसु : पडतुसें असोसु ॥
तरि न धरी त्रासु : चैद्यु तो ॥ ९०४ ॥

आवेशें पंजु घेतली : रणदिक्षा स्वीकरली ॥
मग गह्वाणी केलीं : चातुरंगसैन्यां चीं ॥ ९०५ ॥

करौनि कडसुनी : तेरा तेरा अक्षौणी ॥
एकैकु नायकुशिरोमणी : दळवै केला ॥ ९०६ ॥

ऐसि आं नारायकां : लेखु नाहीं आइका ॥
तेथ एरा दळां चां आवाकां : कवणु करी ॥ ९०७ ॥

असों हें तें दळ देखौनिआं : यादवां चिआं जुआळिआं ॥
मागैतिआं निग लिआ : पवनवेगें ॥ ९०८ ॥

तेहीं जुआळीकारी : सांगितिली दळा ची थोरी ॥
तेहेंळी नागार्जुना चा स्वामी मुरारी कांई करितां जाला ॥ ९०९ ॥

जुंझा ची आइती : करवीतुसें यदुपती ॥ 
तंवं वीर पैजा घेतीं : आपणालेआं ॥ ९१० ॥

अघवें चि वीरू तंवक : वाठीवा अधिक ॥
फुण जुंझा चें बहू बीक : अर्जुना सीं ची ॥ ९११ ॥

तंवं बलिभद्रु बोले : आतां नागरा चेनि फाळें ॥
करैनु सातैं वाताळें : एरीं याहानीं ॥ ९१२ ॥

माझेआ क्रोधाग्नि चिआं तिडकिआं : उसळती गगणां परौतिआ ॥
तेणें हुरहुरां जळति कोंपटिआं : स्वर्गादिकां चिआं ॥ ९१३ ॥

आतां धगधगितेनि मूसळें : शिशुपाळ सैन्या चें जोहनळें ॥
पीठु करैणु एकें वेळें : उखळीं वसुं-धरे चा ॥ ९१४ ॥

तंवं अर्जुन भणे : जरि हें साचु बोलणें ॥
तरि मागिला जुंझीं राणे : कैं गेलें होतें ॥ ९१५ ॥

ऐसा बडिवारू बोलिजे : तो मज एकां अर्जुनां सीं चि साजे ॥
जो एकांकी जुंझे : महाकाळें सीं ॥ ९१६ ॥

आपुलेआं बाणां : करवि जगीं घालवीं आह्वाना ॥
मेयां भुजां चिआं आंगवणा : जिंतिले इंद्रादिकूं ॥ ९१७ ॥

माझेआ ओडना चिअे दडफडे : काळवा सिंपौनि पुढां पडे ॥
तें चैद्यु बापुडे : कांईं मारावें असें ॥ ९१८ ॥

तंवं बलिभद्रु बोलिला : एसना तूं जुंझारू भला ॥
तरि जरासंदां भेनें पळाला : तो कवनु सांगैं ॥ ९१९ ॥

तंवं भीमसेनु भणें : निर्‍हास तव कराने ॥
फुण आमुसीं नोंकौनि बोलने : हें नीकें नोहे ॥ ९२० ॥

आतां उठाउठी : असकेयां ब्रह्मगोळकां देइनु मोठी ॥
मग रिगाल कोंणी माते चां पोटीं : तें पाहीन आतां ॥ ९२१ ॥

आतां असो हा शिशुपाळु : यादवां करीन जगबोळु ॥
आड ठाकों महा-काळु : तेआं हीं रुसैन ॥ ९२२ ॥
तेथ भणातिले उद्धवदेवे : ऐसा गदारो‍ळु नीका नव्हे ॥
हा भीमु आपुलेंनि नावें : आण‍ा आण करील ॥ ९२३ ॥
तें वेळीं देवें आफाऊनु : भीमां दीन्हला सर्वमानु ॥
मग दळवै केला अर्जुनु : यादवां शीं ॥ ९२४ ॥
दोंनि दळां चिआं नाइकवडी : असेंि नव्हानौ कोटी ॥
तेथ एरा दळां गणना फुडी : कवणु करी ॥ ९२५ ॥
एका पासौनि एकु आगळां : ऐसिआं सैन्यां अर्बुजें सोळां ॥
नाव नगैयां कौशलां : सात पद्में ॥ ९२६ ॥
मुदलां कौशला खर्वे-तीस : पांचाळा चे सैन्य असमसास ॥
आणीकु ही राअें मीनलें बहुवस : ते कांई सांगो ॥ ९२७ ॥
यादवां ची सैन्यें सांधों केतुलीं : उ‍ीं न मातीं भूतळीं ॥
गगना चिअें पोकळीं : सामविती ना ॥ ९२८ ॥
तेआं माजी दळवै अर्जुनु : जैसा विराटविअे चा पंचाननु ॥
जेआं चिअें आंगवणे बिहूनु : त्रिनेत्रु वसे कैलासीं ॥ ९२९ ॥
तों पांडवां पा‍रू : कौरवां बडिवारू ॥
रथीं आरूढला आर्जुनवीरू : बहुतें आटोपें ॥ ९३० ॥
सवे चातुरंग चाले नीट जैसीं जगा ची राज वाट ॥
कीं गगनचक्र उठावलें अलोट : काळरात्रीचें ॥ ९३१ ॥
उठविलें असिवारू : जैसे काळकुटा चे धुधुकारू ॥
तैसे पाया चे मोगरू : निगतांती ॥ ९३२ ॥
ना तें प्रळयानीळा चें धावणे : कीं काळाचें अमंत्रणें ॥
देयावेआं निगालें मीं भणें : शिशुपाळा सीं ॥ ९३३ ॥

वारेआं पासौनि वेगाडे : पर्वता हौनि दळवाडे ॥
ते वारू ऊंचवडे : कांइँ वाणौ ॥ १३४ ॥

मग कवतिकैलैनि महाकाळें : प्रलयमारुर्ढ थडियाविले ॥
ना ते पांचुवने जाळु वेढिले : प्रलयपावका चें ॥ १३५ ॥

उच्चैश्रवेया चिअे जावकि के : कांतळें साव्राअणी चे ॥
पंचकल्याण कव्हारिचे : राजवाहकूं ॥ १३६ ॥

सिंधुसागरीचे बोरू : जालौरी चे केंकाणे थोरू :
ऐसें सांधितां भेद अपारूं : तेजिआं चें ॥ १३७ ॥

तेयां चें श्रृंगार पांखरां : सांधितां स्थळ जाइलु विस्तारां ॥
असो हें जमा सीं जेयां चां भेदारा : तें राऊंत आरूढिलें ॥ १३८ ॥

भद्र मृग मद : ऐसें सांधितां गजां चें भेद ॥
ते आइकितां होति आनंद : फुण कथां ठाकैल ॥ १३९ ॥

सिंगळद्वीपीचे माणिकदंड : विंध्याद्री चे श्वेतखंड ॥
चंपावतीचे गजक्रीड : इअें वळाउठें ॥ १४० ॥

कैलासा चेनि पाडे : पुरते दळवाडे ॥
ते चौदंते चोखडे : क्षीरसागरीचे ॥ १४१ ॥

चालते चमकतें : टाळकुटां चें डोंगरू दीसतें ॥
तऱ्हीं तें हातीं उपमीजतें : तेणें पाडें ॥ १४२ ॥

ना तरि काळलोहा चेआं रसां : भरीजेति आंधारा चिआं मुसा ॥
उपमीजता आकारू तैसा : तेयां कुंजरां चां ॥ १४३ ॥

तयां चा श्रृंघारू कांइँ वाणावा : ढेंस कवणु तो जोधां चा मेळावा ॥
जे कांठा चेनि आंधारें कांरति रांत्रिवा : पारिकेआं वरी ॥ १४४ ॥

सपिंड चोखडे : निखळ वज्रां चे दळवाडें ॥
वरि कवतिकें कांडें : रथूं साजिलें ॥ १४५ ॥

ते प्रलयभैरवां चे पांजरें : कीं कृतांता चे चाकुवारे ॥
　कीं कामक्रांति धवळारें : काळरात्रीचीं ॥ ९४६ ॥

तेयां रथां ची जाति कांईं बोलें : रथीं महारथिअें आरूढैलें ॥
　जेविं वाठिवे चे आदित्य उदैलें : तेवि दीसतांतीं ॥ ९४७ ॥

ऐसिआं सैन्यां अपारा : माझारी चालतेआं अर्जुना वीरा ॥
　बरवां दीसताअें शौरा : शृंघारिला रथावरी ॥ ९४८ ॥

पाळेया चा गोटु सांडिला : वनींचा वनदेउ जेवनां धातला ॥
　तंवं उमाळा देखिला : पारिकेयां चा ॥ ९४९ ॥

मोटंकीं दृष्टादृष्टीं जाली : तंवं लाठेयां ची आंगे स्फुरिनिली ॥
　जोड दुपटीं उतटैली : आंगी बाणती चि ना ॥ ९५० ॥

सिंह्वनादू दीह्लें वीरीं : तंवं भेडां आलीं सिआंरीं ॥
　बाजतां दांतौरीं : कांईं आइकिजे ना ॥ ९५१ ॥

तेह वेळीं बळी रे बळी भणतु : भेडां तें उपटी हाणतु ॥
　आढाऊं ऊंठिलें उह्लाळे घालितु : धनुवाडेयां पुढां ॥ ९५२ ॥

तें आढाऊं तरि सुरेख : दावितांति चालि पाडुरेख ॥
　एरूं ढडें तोडिती निलेख : खरहातुपणें ॥ ९५३ ॥

कैसा जीवा चा लाठु : ऐसियां उडणा देउनि साटु ॥
　असकिया लोहा चा भरौनि घोटु : मग निवटतांता ॥ ९५४ ।

हातिएरां चेनि खडाडें : खांडा कींकसू पडे ॥
　चौमेरीं लोळवितांति धडे : तेथ खिची थोरी जाली ॥ ९५५ ।

अडखुळतां शिसाळां चिअें दगडाळी : धडां वरी धडें पडिलीं ॥
　तें देखोनि शैल्या चां साबळीं : काढाउ काढिला ॥ ९५६ ।

अर्जुना चें भणती राहा रे राहा : आमुतें येतां कां न साहा ॥
　मा पाचारिलेयां कें जातु आहा : तुम्हीं चांग पाइकूं ॥ ९५७ ।

आतां हातिएरू काढा : तरि घाऊ न घलु फुडां ॥
एरूं भणैति कां रिगा ना पुढा : कांई पांतुसा ॥ ९५८ ॥

जा रे जा मागौति : आम्हीं पातलो शैल्या चें हातीं ॥
साहा रें साहा भणौनि हाणती : परतौनियां ॥ ९५९ ॥

ऐसें पुन रे धनु भणत : पातलें जादवां चे राऊत ॥
मारि रे मारिजैलु पळत : कातेकारू हे ॥ ९६० ॥

ते देखौनि राउताळें : पुढील कांतेकारू मुरडैलें ॥
थरू रे थीरूं भणत वाइलें : पारकां विदुरथा चां ॥ ९६१ ॥

ते नेणों कैसें पारिकें लाठे : पाखाणी खांडें न संटे ॥
तोडौनि पाखरां दुपटें : धड वेगळांलीं करितांती ॥ ९६२ ॥

पुढीलें आळमाळु वाढीनिलें : तें पारकां ठाणौरी केलें ॥
फुण वीसाहाणीचें राऊंतु परितिलें : तें साहाती चि ना ॥ ९६३ ॥

तेह्वेळीं शिशुपाळा चें राऊत : पारकेयां वरी वाट करितु ॥
आलें सुराठी सिंथितु : सरेगाऊ ॥ ९६४ ॥

हीरवीं कडबाडें : ते चिं तोडीतु आलें चहूं कडे ॥
तें देखौनि पातलें उखरडें : यादवां चें ॥ ९६५ ॥

आलें रे आलें भणत : धेंसापिटें जालें राउत ॥
ऐसां धुरां टाकिलियां पळत : कांडा चां आळवीं ॥ ९६६ ॥

तंवं सात्यकी भणतिलें : परता गा परता वहिलें ॥
पारुकें आंगां घडलें : शिशुपाळा चें ॥ ९६७ ॥

मग वाखाणीजतु भाटीं : सात्यकी ऊळधिला थाटीं ॥
तंवं राउतां जाली हातपीटी : रांगे चेयां ॥ ९६८ ॥

हाणौनि सेलाटी : फोडिंती पाखरां दुपटीं ॥
धरौनि घोडा चां गौटीं : निवटिती असिवारा तें ॥ ९६९ ॥

कानसुलां भाली : आंगें कूट जाली ॥
माथें भीरतांती कोथळी : घांईं लुहुडी चां ॥ ९७० ॥
कुंसी कडतरतांती भालें : लोंबतीं आंतां चें पेंटाळें ॥
तऱ्हीं रणमदें मातालें : राऊंत धरतीं चिना ॥ ९७१ ॥
तें झुंझू सांगो केसै : तुटौनि पडती शिसें ॥
रोडें झुंझेति आवेशे : खंडविखंडी ॥ ९७२ ॥
मोंडले चिंन मोंडेंति : खोंचलें चिन खोंचेति ॥
कव्हणीं कव्हणां न लोटिती : तेथ खिची थोरू जाली ॥ ९७३ ॥
तंवं आंधारवडा जवळें : भड खुळीं होतें राहिलें ॥
तै राऊत तिकडौनि पातलें : दंतवक्रा चें ॥ ९७४
यादवु होतें थोकलें : ऐसां हीं तिनि ऊन्तनें झुंझीनिलें ॥
फुण एरीं सावधीं वाइले : भणऊनि मोडलें ॥ ९७५ ॥
तेथ बहुत माणुख रणां आलें : अक्रूर सात्यकी घाईं उचलिलें ॥
कृत्तवर्म्मा बलिभद्र काढिलें : झुंझतजुंझतां ॥ ९७६ ॥
दळां सीं जाला भंगु : न धरे चि पांरुकेआं चा वेगु ॥
तेह्वेळीं अर्जुनराय रणभंगु : कांईं करितां जाला ॥ ९७७ ॥
आवेशें सरिसा वेठला : गांज़िवां हातु घातिला ॥
मग रथूं प्रहरविला : सारथिआं करवी ॥ ९७८ ॥
पारकियां चिए अरणी : घालितु आला लोह्या ची गवसनी ॥
भीडला समरंगणी : आमोलेपणें ॥ ९७९ ॥
सूं सूं करितु : आगिअेला चा सीरवा वरीखतु ॥
तेविं थोरकांडी सिंथितु : एकें वेळें ॥ ९८० ॥
आमोलेआं चेआं हेलकांडा : फोडीतु पाखरा जोडा ॥
तोडीतु मोह्डा : भद्रजाती चिआं ॥ ९८१ ॥

करौनि बिरथां : कुन्हांडिआं चिआं चळथां ॥
घेतु आला पांथा : महारथिआं चिआं ॥ ९८२ ॥

दंतवक्रू सर्वफळेयां सीं आला : तो हिरवां ची धरिला ॥
थापां हाणौनी हातिअेरूं हिरतीला : विदुरथा चा ॥ ९८३ ॥

आला रे आला भणतु : पुढिलां धुरां पळ सूटतु ॥
शैल्यु रिगाला असासितु : डागे यमुनें चिअे ॥ ९८४ ॥

मग तेणें वैरि विभांडे : पिटौनि खांडया चेनि भडाडें ॥
सांडविलें गज रथु घोडें : असंख्यातु ॥ ९८५ ॥

पारिकेआं तें जिणौनु : मागौता आला अर्जुनु ॥
एरी कडे काई करितां जाला नंदनु : दमघोषा चा ॥ ९८६ ॥

शैल्ये थोर अरे ठकैलें : तंवकें तीनि अुत्तना वाइले ॥
मग एकें वेळें आले : पाळेया चा गोटु वेन्ही ॥ ९८७ ॥

यादवांचे आं कटकां भीतरीं : पारकां आटाआटीं केलीं थोरी ॥
मग काई करितां जाला मुरारी : दैत्यविभांडु ॥ ९८८ ॥

सिंहासना वरौनि ऊठिला : तंवकें असासितु निगाला ॥
तंवं वारू मेळाविला : वारुडेनि ॥ ९८९ ॥

तो वाणितां वारूं : निन्हा न करी विस्तारूं ॥
साउमा असिका वीरू भणावा असें ॥ ९९० ॥

तेजियां चेनि दळभिडें : गरुड नव्हे तेणें पाडें ॥
तो पौवाळितांअे वेगाडे : मनोहरां गती ॥ ९९१ ॥

गरुड होअे चालना : फुन रूपें रेखां उना ॥
वरि वागे चिआं खुणां : काहीं नेणें ॥ ९९२ ॥

मन होअे वेगाडें : फुण तें अणु एव्हढें ॥
भणअुनि उपमा न घडें : तेआं वारुवां सीं ॥ ९९३ ॥

तो कैसा दिसताए कांतळा : जैसा अ-मृतरसाचा ऊतिला ॥
कीं श्रेष्टेंने धडा घातला : रेवांता सी ॥ ९९४ ॥
तो कापुरें ऊटिला : कीं चांदिणेनि चुभाळिला ॥
कीं पाखरा गवासिला : मौक्तिकां चिआं ॥ ९९५ ॥
झळाळितेआं सूर्य्य मंडळा : वरि सांवळा मेघु ढमढला ॥
तैसा तो मुरारि मिरिविला : कांतळेयां वरी ॥ ९९६ ॥
तो चैत्यन्यगिरीदुर्गीचा राऊ : लेइला शशीकुनाहो ॥
निघाला घेयावेआं घाऊ : शिशुपाळें सीं ॥ ९९७ ॥
एह्वढें विश्वरूपु जाला : तो वीरराज जयां चा खेळा ॥
तो सूत्रधारू राउतें अवगुला : तो कैसा सांगौं ॥ ९९८ ॥
तो जैसा काळलोहें डवरिला : ना तरि प्रलैआंधकार उटी ऊळघैला ॥
कीं पाणिअें नहाणिला : काळकूटा चेनि ॥ ९९९ ॥
तळवागे वरवागे निर्वाळिला : वाहाकविधें वहिला ॥
असंतु हें पाबळें बोला : वाउगें काई बोलों ॥ १००० ॥
ना तरि प्रलयानला चिआं मुसीं : उटी ऊळघैला जैसी ॥
वज्रांगी लेइला तैसी : प्रलयमेघां ची ॥ १००१ ॥
मग धन थीरु भणतु : रेवांता आदि-गुरू होतु ॥
निघाला राउतै करीतु : असिवारां पुढें ॥ १००२ ॥
सातां पाताळां चां भइरीं : अेरे पारिके हो रीगाल्ह जरीं ॥
तुमतें खाणौंनि काढैनु तरीं : ऐसें खरदळितुसें ॥ १००३ ॥
आंगीचीआं खरवां : ढळतां कैसा सांगावा ॥
जैसा रणरंगिचा नटोवा : सराऊं करितुसे ॥ १००४ ॥
खवळैला कृतांतु डाडाइला : की निदुसुरा महाकाळु ऊसानाइला ॥
तैसा हिंहिंकारू केला : वारुवें तेणें ॥ १००५ ॥

धालाधाली चें आंग सांघौं कैसें : चालितां बिंबु न दिसें ॥
वेगां समुद्रीचें तारूं जैसें : पुआळितु ॥ १००६ ॥

वेह्लावती टापु घाली : चामकें मागिलीं दों चि पाउलीं ॥
पुढिलें खरपुटें ठेवी कुंभस्थळीं : दिग्गजां चां ॥ १००७ ॥

रागा दाटिलेआं उसळें सूर्य्यमण्डळा परौतां चौताळें ॥
परि वरिचा वरी घे सवंफळें दिग्गजां सीं ॥ १००८ ॥

जोड करितां खुरपुटीं : तोडौनि अरि-शिरें गोमटीं ॥
जैसीं रेवांता धुर्जेठी : पुजा बांधितुसें ॥ १००९ ॥

संग्रामसमुद्रा चा आवर्तु : तैसा वेढेआं असें रीगतु ॥
सांकडी मोकालिला दिसे रीगतु : पायां माजी ॥ १०१० ॥

मोंटका देॐ वागारां हातु घालीं : सवें चि बैसे मागिलीं पांसाळी ॥
मागिला कळाविआं पुढिलां तळीं : निगौनि जाती ॥ १०११ ॥

दावितां खंडवेगु : कैसे राउतै चें आंगु ॥
मुरडतां झिन्न वेगु : डोळां सुजावती ना ॥ १०१२ ॥

घेतां त्रिपे चें चाचरें : वावडाअे पांचविअे धारें ॥
तरि वेगा चां धारसां जाअे पुरें : प्रलअे मारुता ॥ १०१३ ॥

ऐसें राउतै चें अंग : वर्णितां बोल होति सुरंग ॥
फुण पुढां जुंझ भणावेसें चांग : दोहीं धुरा चें ॥ १०१४ ॥

तेयां मुरारी चे सैन्य पालाणिलें : जैसें मूर्तिसंहारु तेजे वेठले ॥
कीं भूमी जैल लोटलें : प्रलय मेघां चें ॥ १०१५ ॥

शौर्यसरितां चा ॐघु सूटला : कीं प्रलयसमुद्रा चा तुंब फूटला ॥
तैसा घसरें निगाला : दळभारूं तो ॥ १०१६ ॥

ढळतु फरारें पताका : मिंळतु चवरें सडका ॥
मांडौ होतसें मृत्युलोकां कुळाचळ वेव्हीं ॥ १०१७ ॥

झळंब्रा चे घणघोषा मिळतां बुंथि घालिताअें आकाशां ॥
चिरें वेढितांति दाही दिशां : पाल्लव्र सातियां चीं ॥ १०१८ ॥
संहार मेघां चां पोटीं : उकलेति कोळ विजुचिआं पुटीं
तैसियां हाथियेरां चिआं दाटी : दीसेति चहूंकडें ॥ १०१९ ॥
ते प्रलयनळा धुंम्रा चें गुंडाळे : कीं काळकुटा विरढें फूटलें ॥
ना तें सांवळें आकाश पाह्लें : लोहां चेनि मिखें ॥ १०२० ॥
कीं कोपलेयां महाकाळां : काळलोहां चां तवंगु बांधिला ॥
असो हे अमोलेआं चा अमोला : पुढें चालताअे ॥ १०२१ ॥
रण-पिशें रण-राक्षसु : जगदळ जगनिवासु ॥
खांडे थोवेकारू असमसासु : एरां लेख नाहीं ॥ १०२२ ॥
गंडगर्व गंडगोपाळ : भाले भयासुर भारशांखळ ॥
रणनोवरें रणबंबाळ : लहुडी पंचाननु ॥ १०२३ ॥
जगच्चवर जगमल्ल : रणसोयरे रणबागुल ॥
तोडरराअे तोडरमल्ल : खांडे भडाडा ॥ १०२४ ।
हें चातुरंगीचें वीर : एरूं जुंझतें असेंति अपार ॥
असो हें ते एकली धुर : कवणां न पुरें ॥ १०२५ ॥
तेथ वाजती शंख काहाळा : तुररिआं तोंडी खरटिवाळा ॥
डौंडी चीं ढवंस ढोला : वीरघंटा तांबकिया ॥ १०२६ ॥
निशान पटहो भेरी : राअे-गिडगिडिआं रणमोहरी ॥
ऐसेंआं वाद्यंत्रां चां गजरीं : पातिला रणभूमी तो ॥ १०२७ ॥
कोह्लैरी ची महाकाळी पाहिली : चांपैविहिरीं जेवनी घातली ॥
मग राजबनां आला वनमाळी : टाकितु पारकेआं तें ॥ १०२८ ॥
तंवं भाटीं ब्रह्माऊ केला : तेआं चैद्यां चा देशू पसायां दीह्ला ॥
मग देवे मेळावा पुसिला : शिशुपाळा चा ॥ १०२९ ॥

हा रे कितीं दळांची थोरी : कवणुंसें कवणां भारीं ॥
मुदल धुर ॲळखावी कवणी परी : कवणें टके नेसीं ॥ १०३० ॥
तिहीं विणविलें हा होजी अवधारिले : ते सैन्यु सांगौ केतुलें ॥
मुदल मंडळीकु लेखिलें : तंवं जालीं तीस पद्में ॥ १०३१ ॥
पैलु नीळेयां सातिंआं चा धुधुका : डोलतुसें जगझंपु टका ॥
तो मेळावा रणकाळडंका : विदुरथा चा ॥ १०३२ ॥
आहो जी देवा : पैलु देखिला महापडां चा मेळावा ॥
तेथ असें वैरीवणवा : दंतवक्रू ॥ १०३३ ॥
स्याहाणौ कोडी तेजियां : पुढां डोलतांती पडवळकाठियां ॥
तेथ असें चैद्या चा मानियां : प्रताप मुकुटू ॥ १०३४ ॥
आंगवणा करावेआं खोंचणी : वेठिलिआं बत्तीस अक्षौणी ॥
तिअें थाटीं ॲळघैला नायकशिरोमणी : राणेराॐ ॥ १०३५ ॥
साटि लक्ष रथां चीं मांडणी : करौनि आकाशां इडि बांधौनी ॥
तेथुसें अरिराअेखदणी : विक्रमसेनु ॥ १०३६ ॥
जेथ माताइतें भद्रजाती : मेरूमांदारा सि वेंझ देॐ पांती ॥
तेथ राअे रक्षपाळ सैन्यपती : शैल्यू असें ॥ १०३७ ॥
पैलु काळविजुसांगडी : लखलखितें खांडीं ॥
दाटितांती श्रीगिरी चहूं कडी : पाळुवसातियां चिआं ॥ १०३८ ॥
तेथ राअे रणबंबाळु : खांडें नसीं महाकाळु ॥
वेठिलासें शिशुपाळु : दमघोषा चा ॥ १०३९ ॥
ऐसें आइकौनि यदुपाळु : पारिकेआं करितु जगबोलु ॥
जिअे अरणी असें शिशुपाळु : तेथ एतां जाला ॥ १०४० ॥
तो देखौनि यादवां चा उमाळा : एरीं सिंहनादु दीह्नला ॥
मग दोंहीं दळां आदळु जाला : तो कैसा सांगौ ॥ १०४१ ॥

प्रलअेभयरवां झोंबी जाली : कीं संहारसमुद्रा थडकूं घेतिली ॥
तैसीं घसरें मिसळैली : दोंनीं दळें ॥ १०४२ ॥

रणभूमी चा घाणा करौनि सरिसां : महाकाळु इक्षु गाळीतुसें जैसा ॥
गरगरां आतु भवंतुसें तैसा : दोहीं दळांचा ॥ १०४३ ॥

कीं दळावेआं पृथिवी चां जातां : काळरात्रीं वैरणें घातलें मजपांतां ॥
तेवि दोंनि दळें भिडतां : वीरां चें पीठ जालें ॥ १०४४ ॥

साबळी झेलितां : गजकोंतीं गुसळितां ॥
पायां चें भिडतां : तोडिति जानिवसे जे ॥ १०४५ ॥

मोडलें साबळ सींगनी : तेथ जाली केंशधरणी ॥
आमोले उसासितांती रणीं : कटारे वेऱ्हीं ॥ १०४६ ॥

मिळौनि मकर-तोंडां मकरतोंडे : सारथियां चा तोंडीं सूनि खांडें ॥
निवटितांती धडें : महारथियां चीं ॥ १०४७ ॥

फोडीतु करवाळें : काढितीं आंतां चे पेटाळे ॥
द्वयदळींचें वीरू भीडलें : बहुतें आवेशें ॥ १०४८ ॥

धरौनि कडिपाळा चां गोटीं : असिवारू झुंझतांती हातपीटीं ॥
एकैकु सहस्त्रां तें निवटी : फुण तवकूं जाअे ना ॥ १०४९ ॥

रणकर्कशें तुरें वाजती : महा पंडा चिअां जवणिकां फीटतीं ॥
वार अती बगला ॐ खेळती : रण-बहू-रूपीं ॥ १०५० ॥

काळलोहा चिअे मेहुलनीं : आपुला परावा न सुजे रणीं ॥
तेथ जाली दीपलावनी : खांडीं मिसळतां ॥ १०५१ ॥

पडतां खांडेआं चां धारसां : दाटतु लोहाचा वळसा ॥
ते नेइजेति बाणां चां मासां : अविष भणौनी ॥ १०५२ ॥

निशानु काहाळां तांबकिआं : रायगिडगिडि बोबडिआं ॥
वाजतां अंबरू जाले चिरटिआं : तिअें वेळें ॥ १०५३ ॥

रणकर्कशे भयासुरें : बोंबातीं मुडदरें ॥
सातां पाताळां चे दरे : थरारितांतीं ॥ १०५४ ॥

रथां चां धडधडाटीं : भाटां चां गजबजाटीं ॥
पाअें रीगतांती पोटीं : वसुंधरे चें ॥ १०५५ ॥

जुझंतां रणीं शीणलें : शौरें घाईं मातलें ॥
हातींचें रुधिरूं पीतांतीं ताहेले : तडस भणौनी ॥ १०५६ ॥

एक कुंथितु पढवंतु : एक सेकसीतु कण्हतु ॥
वीर असेंति डाडातु : रणां माजी ॥ १०५७ ॥

एकु ठाईं हुंबति : एकु चाचरी जाति ॥
एकु अडखळौनि पडति : मढआं वरी ॥ १०५८ ॥

तेथ थोरू कंदन झालें : भयानकु रण पडिलें ॥
भूतावळीं आवारीव केलें : दैत्यमांसा चे ॥ १०५९ ॥

असों हे शब्दरचना बरवि : मग तो नागार्जुना चा गोसांवी ॥
सांगे भास्करकवी : कैसा जुझितां जाला ॥ १०६० ॥ * ॥

मारौनि गजरथां ची दळें : वीरा चें उठकलें केलें ॥
मग आंगा पडिला एकें वेळें : शिशुपाळा चे आं ॥ १०६१ ॥

संहारा सी महासंहारु खुशिला : कीं महाकाळा सी महाकाळु कोपला ॥
तैसा समरंगणीं भीडीनिला : यादवराॐ ॥ १०६२ ॥

मिळौनि नाकवसेंआं नाकवसें : धायखंडी हाणतांति सरिसें ॥
जुंझतांति बहुतें आवेशें : दोंनि धुरां ॥ १०६३ ॥

खोलतु खीलतु : डावे जेवणें धाअे सांडितु ॥
हाकितु पाचारितु : जुंझतांति ॥ १०६४ ॥

चैथे भालेआं ची हुली घातिली : तिआं देवां ची वज्रांगी फोडिली ॥
अळुमाळु चिरटी गेली : फुण रुपे चि ना ॥ १०६५ ॥

मग हात वसौनि गदा करतळीं : श्रीकृष्णे हाणिला वक्षस्छलीं ॥
तेणें घाअे गिरिरीं आली : फुण पडे चि ना ॥ १०६६ ॥

चैद्यु घाईं मातला : हाक देऊनि उसळैला ॥
तो देवें पांचारौनि खोचिला : वरिचा वरी ॥ १०६७ ॥

मग देॐ भणें हो हो कां उसाससीं : राहे राहे कां पळिसीं ॥
आतां पां खांडे नापिसी : तंवं मारौणी फेडिन ॥ १०६८ ॥

तंवं भणें दमघोषा चा कुमरू : तूं गौवळां चा जुंझारू ॥
तु सी घेतां हथिअेरू : मीं लाजतुसें ॥ १०६९ ॥

श्रीकृष्ण भणे तो तूं नव्हसीं : जै वैदर्भिअे ते प्रणॐ आलासी ॥
मग मेयां नोंवरा केलासी : बहुरूपिआं चा ॥ १०७० ॥

तंवं चैद्यु भणें हो हो राहे : माझा घाअे साहे ॥
पाचारौनि सव्य बाहे : वांचौनि हाणे ना ॥ १०७१ ॥

तंवं भणतिलें श्रीरंगे : सरि रें परौतें उगें ॥
कितीं जल्पेसीं वाउगें : बांधिलिआं चौरा परी ॥ १०७२ ॥

ऐसें बोलौनि ह्रषीकेशी : जाणीवसे जेंहाला बाहु सीं ॥
तेयां घायां चीं घेऊनि विवशी : पळाला चैद्यु तो ॥ १०७३ ॥

यमुनें चिआं डागा निगाला : तपोवनीचा आंबा डावा घातिला ॥
मग यज्ञमंडपांतु रिगाला : हसासितु ॥ १०७४ ॥

तंवं तो दैत्युकृतांतु : पातला ठाकां चेपितु ॥
तेव्हळीं कांईं करितां जाला सुतु : दमघोषा चा ॥ १०७५ ॥

उतरिला तेजिया वरौनी : ऊढणुखांडे हातें वसौनी ॥
परातिला पाचारौनी : उलाळें घालितु ॥ १०७६ ॥

संहारप्रलअेमेघु घडघडिला : कीं खवळैला महाकाळु डाडाइला ॥
तैसा ऊढणुखांडा पडिताळितु आला : पत्रगुत्रेगें ॥ १०७७ ॥

तंवं दा-पातियां धारां चें : सुदर्शन काढिलें डांबे चे ॥
मग जुंझ घेआवेयां एकाकीचें : देउ खालीं आलें ॥ १०७८ ॥
जया चेआं खांडे करावेयां धुनी : न पुरें प्रलयमेघां चें पाणी ॥
तेणें चक्र मोकलिला धरणीं : शिशुपाळा वरी ॥ १०७९ ॥
तंवं जाला रे जाला जगबोळु : भणौनि बोबाइला प्रलयवेताळु ॥
महाकाळें काळु : तो डिंहाला ॥ १०८० ॥
सुदर्शना चां जोहरी : सांपडलिआं रे सांपडलिआं खेचरी ॥
भणौनि एकी बोंब सुटली द्वारीं : प्रलयभैरवां चां ॥ १०८१ ॥
असों हे तेयां चक्रा चां धारसां : पडलियां संह्वारतेजांचां वळसा ॥
तेणें गरगरां भवंता अें शिशा : शिशुपाळा चें ॥ १०८२ ॥
तें कवतिक वीतलें आइका : शरीरौनीं निगाली ज्योतिकाळिका ॥
ते देखतां तिहीं लोकां : विसावली श्रीकृष्णचरणीं ॥ १०८३ ॥
हेळां चैद्यु वधिला : देवीं पुष्पवर्खाउ केला ॥
रणीं जैतवादी जाला : यादवनरेंद्र ॥ १०८४ ॥
सवंदळीं जीणौनि वैरी : यागु सिद्धी नेला मुरारी ॥
मग मागौते आलें सपरिवारी : द्वारके शीं ॥ १०८५ ॥
जेयां चेनि वैराडपणे : चैद्यें घेतिलें मोक्षा चें निजवणें ॥
तेयां चेनि होये कथाश्रवणें : तें कवण जाणे ॥ १०८६ ॥
हा शिशुपाळवधु : आईकितां तुटे भवबंधु ॥
जीवां होअे प्र-बोधु : परमतत्वां चा ॥ १०८७ ॥
शके शरांकरुद्रशत रोकडे : श्रीमुख माधवमासु चोखडे ॥
तै श्रीकृष्णा चे पवाडे : वाणिलें मियां ॥ १०८८ ॥
ऐसा नागार्जुनां चा दातारू : मिया वर्णिला श्रीचक्रधरू ॥
तो भक्तां मंगलकरू : भणे कवी भास्करू ॥ १०८९ ॥

इति श्रीपरमधर्मे महामौक्षैकसाधनें श्रीनागार्जुनोपदेशें
द्वितीयाचार्यश्रीभास्करकवीश्वरमहानुभावकृत—शिशुपालवध-
भारतीकथा संपूर्णमगमत् ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ७ ॥ ७ ॥ ७ ॥